

दादा भगवान कथित

# समजपूर्वक प्राप्त ब्रह्मचर्य

( संक्षिप्त )



Marathi

दादा भगवान कथित

# समजपूर्वक प्राप्त ब्रह्मचर्य

(संक्षिप्त रुपात)

मूळ गुजराती संकलन : डो. नीरूबेन अमीन

अनुवाद : महात्मागण

# त्रिमंत्र







नमो अरिहंताणं

नमो सिद्धाणं

नमो आयरियाणं

नमो उवज्झायाणं

नमो लोए सव्वसाहूणं

एसो पंच नमुक्कारो,

सव्व पावप्पणासणो

मंगलाणं च सव्वेसिं,

पढमं हवइ मंगलम् ॥१॥

ॐ नमो भगवते वासुदेवाय ॥२॥

ॐ नमः शिवाय ॥३॥

जय सच्चिदानंद



## दादा भगवान फाउन्डेशनची प्रकाशित पुस्तके

### मराठी

१. भोगतो त्याची चूक
२. एडजेस्ट एव्हरीव्हेअर
३. जे घडले तोच न्याय
४. संघर्ष टाळा
५. मी कोण आहे ?
६. क्रोध
७. चिंता
८. प्रतिक्रमण
९. भावना सुधारे जन्मोजन्म
१०. कर्माचे विज्ञान
११. पाप-पुण्य
१२. आई-वडील आणि मुलांचा व्यवहार
१३. पति-पत्नीचा दिव्य व्यवहार
१४. समजपूर्वक प्राप्त ब्रह्मचर्य
१५. मानव धर्म
१६. मृत्युवेळी, आधी आणि नंतर
१७. सेवा-परोपकार
१८. दान
१९. त्रिमंत्र
२०. वर्तमान तीर्थंकर श्री सीमंधर स्वामी

### हिन्दी

१. ज्ञानी पुरुष की पहचान
२. सर्व दु:खों से मुक्ति
३. कर्म का सिद्धांत
४. आत्मबोध
५. मैं कौन हूँ ?
६. वर्तमान तीर्थंकर श्री सीमंधर...
७. भुगते उसी की भूल
८. एडजस्ट एवरीव्हेयर
९. टकराव टालिए
१०. हुआ सो न्याय
११. चिंता
१२. क्रोध
१३. प्रतिक्रमण
१४. दादा भगवान कौन ?
१५. पैसों का व्यवहार
१६. अंत:करण का स्वरूप
१७. जगत कर्ता कौन ?
१८. त्रिमंत्र
१९. भावना से सुधरे जन्मोंजन्म
२०. प्रेम
२१. माता-पिता और बच्चों का व्यवहार
२२. समझ से प्राप्त ब्रह्मचर्य
२३. दान
२४. मानव धर्म
२५. सेवा-परोपकार
२६. मृत्यु समय, पहले और पश्चात
२७. निजदोष दर्शन से... निर्दोष
२८. पति-पत्नी का दिव्य व्यवहार
२९. क्लेश रहित जीवन
३०. गुरु-शिष्य
३१. अहिंसा
३२. सत्य-असत्य के रहस्य
३३. चमत्कार
३४. पाप-पुण्य
३५. वाणी, व्यवहार में...
३६. कर्म का विज्ञान
३७. आप्तवाणी - १ से ८ और १३ (पूर्वार्ध)
३८. समझ से प्राप्त ब्रह्मचर्य (पूर्वार्ध-उत्तरार्ध)

★ दादा भगवान फाउन्डेशन द्वारे गुजराती, हिन्दी आणि इंग्रजी भाषेत सुद्धा बरीच पुस्तके प्रकाशित झाली आहे. वेबसाइट www.dadabhagwan.org वर सुद्धा आपण ही सगळी पुस्तके प्राप्त करु शकता।

★ प्रत्येक महिन्यात हिन्दी, गुजराती आणि इंग्रजी भाषेत दादावाणी मेगेझीन प्रकाशित होत आहे.

# दादा भगवान कोण ?

जून १९५८ संध्याकाळची अंदाजे सहाची वेळ, सुरत स्टेशनवर अलोट गर्दी होती. प्लेटफार्म नंबर तीनच्या रेल्वेच्या बाकावर बसलेले श्री. अंबालाल मुळजीभाई पटेल रुपी देहमंदिरात नैसर्गिक स्वरूपात कित्येक जन्मांपासून व्यक्त होण्यासाठी आतूर असलेले 'दादा भगवान' संपूर्णपणे प्रगट झाले आणि निसर्गाने सर्जन केले अध्यात्माचे अद्‌भूत आश्चर्य! एका तासात विश्वदर्शन लाभले! मी कोण ? भगवंत कोण ? जग कोण चालवत आहे ? कर्म म्हणजे काय ? मुक्ती कशाला म्हणतात ? इत्यादी जगातील सर्व आध्यात्मिक प्रश्नांची रहस्ये संपूर्णपणे प्रकट झाली. अशा प्रकारे निसर्गाने विश्वाला प्रदान केले एक अद्वितीय, संपूर्ण दर्शन आणि ह्याचे माध्यम बनले अंबालाल मूळजीभाई पटेल, जे होते गुजरातचे चरोतर जिल्ह्यातील भादरण गावचे पाटील, कंट्राक्टचा व्यवसाय करणारे आणि तरीही पूर्ण वीतराग पुरुष.

त्यांना ज्ञान प्राप्ती झाली तशी ते फक्त दोन तासात इतर मुमुक्षुनां सुद्धा आत्मज्ञान प्राप्ती करवीत असत, त्यांच्या सिद्ध झालेल्या अद्‌भूत ज्ञान प्रयोगाद्वारे. त्याला अक्रम (क्रमविरहीत) मार्ग म्हटले जाते. अक्रम म्हणजे क्रमाशिवायचा आणि क्रम म्हणजे पायरी पायरीने, क्रमाक्रमाने वर चढणे! अक्रम म्हणजे लिफ्ट मार्ग! शॉर्ट कट!

ते स्वतः प्रत्येकाला 'दादा भगवान कोण ?' ह्याबद्दलची फोड करून देताना म्हणायचे की, ''हे दिसतात ते 'दादा भगवान' नाहीत. हे तर ए.एम. पटेल आहेत. आम्ही ज्ञानीपुरुष आहोत आणि आत प्रगट झाले ते दादा भगवान आहेत. दादा भगवान तर चौदालोकाचे नाथ आहेत, ते तुमच्यात पण आहेत, सर्वांमध्ये आहेत! तुमच्यात अव्यक्त रुपात आहेत आणि 'येथे' माझ्या आत संपूर्णपणे व्यक्त झालेले आहेत! माझ्या आत प्रगट झालेले 'दादा भगवान' यांना मी पण नमस्कार करतो.''

व्यापारात धर्म असावा परंतु धर्मात व्यापार नसावा. या सिद्धांताने त्यांनी आपले संपूर्ण जीवन व्यतीत केले. संपूर्ण जीवनात त्यांनी कधीही कोणाकडूनही पैसे घेतले नाहीत, उलट स्वतःच्या व्यवसायातून झालेल्या फायद्यातून भक्तांना यात्रा करवीत असत.

## आत्मज्ञान प्राप्तीची प्रत्यक्ष लींक

मी तर, काही लोकांना माझ्या हातून सिद्धि प्रदान करणार आहे. नंतर कोणीतरी हवा की नको! नंतर लोकांना मार्ग तर हवाच ना?

**– दादाश्री**

परम पूज्य दादाश्री गावो-गावी, देश-विदेशी परिभ्रमण करुन मुमुक्षुंना सत्संग आणि आत्मज्ञान प्राप्ती करवीत होते. दादाश्रींनी आपल्या हयातीतच पूज्य डॉ. नीरुबहन अमीन (नीरुमा) यांना आत्मज्ञान प्राप्त करवून देण्याची ज्ञानसिद्धी प्रदान केली होती. दादाश्रींच्या देहविलयानंतर नीरुमा त्यांच्याप्रमाणेच मुमुक्षुंना सत्संग व आत्मज्ञाप्राप्ती निमित्त भावाने करवित असत. पूज्य दीपकभाई देसाई यांना दादाश्रींनी सत्संग करण्याची सिद्धी प्रदान केली होती. पू. नीरुमांच्या उपस्थितीतच त्यांच्याच आशीर्वादाने पूज्य दीपकभाई देश-विदेशात कित्येक ठिकाणी जाऊन मुमुक्षुंना आत्मज्ञान प्राप्ती करवून देत होते, हे कार्य नीरुमांच्या देहविलयानंतर आजसुद्धा चालूच आहे. या आत्मज्ञान प्राप्तीनंतर हजारो मुमुक्षु या संसारात राहून, सर्व जबाबदाऱ्या संभाळत असताना सुद्धा मुक्त राहून आत्मरणतेचा अनुभव घेत आहेत.

पुस्तकात मुद्रित वाणी मोक्षार्थीला मार्गदर्शनासाठी अत्यंत उपयोगी सिद्ध होईल, परंतु मोक्षप्रप्तिसाठी आत्मज्ञान प्राप्त करणे गरजेचे आहे. अक्रम मार्गाने आत्मज्ञान प्राप्तीचा मार्ग आजसुद्धा चालू (मोकळा) आहे. जसा प्रज्वलित दिवाच दुसऱ्या दिव्याला प्रज्वलीत करु शकतो, त्याचप्रमाणे प्रत्यक्ष आत्मज्ञानींकडून आत्मज्ञान प्राप्त करुनच स्वत:चा आत्मा जागृत होऊ शकतो.

# निवेदन

परम पूज्य 'दादा भगवान' यांच्या प्रश्नोत्तरी सत्संगात विचारलेल्या प्रश्नांचे उत्तर देताना त्यांच्या श्रीमुखातून अध्यात्म आणि व्यवहार ज्ञानासंबंधी जी वाणी निघाली, ती रेकॉर्ड करून, संकलन व संपादन करून पुस्तकांच्या रुपात प्रकाशित केली जात आहे. त्याच साक्षात सरस्वतीचे अद्‌भूत संकलन ह्या पुस्तकात झाले आहे, जे आम्हा सर्वांसाठी वरदानरुप ठरेल.

प्रस्तुत अनुवादाची वाक्यरचना मराठी व्याकरणाच्या मापदण्डा वर कदाचित खरी ठरणार नाही, परंतु दादाश्रींची गुजराती वाणीचे शब्दशः मराठी अनुवाद करण्याचा प्रयत्न केलेला आहे, की जेणे करुन वाचकांना असा अनुभव व्हावा की दादाजींचीच वाणी ऐकली जात आहे. पण तरीसुद्धा दादाश्रींच्या आत्मज्ञानाचे अचूक आशय, जसे आहे तसे तर तुम्हाला गुजराती भाषेतच अवगत होईल. ज्यांना ज्ञानाचा गहन अर्थ समजून घ्यायचा असेल, ज्ञानाचा खरा मर्म जाणायचा असेल, त्यांनी या हेतूने गुजराती भाषा शिकावी अशी आमची नम्र विनंती आहे.

अनुवादातील त्रृटींसाठी आपली क्षमा प्रार्थीतो.

# वाचकांना...

❖ ह्या पुस्तकातील मुद्रित पाठ्यसामग्री मूळतः 'समजथी प्राप्त ब्रह्मचर्य' या गुजराती पुस्तकाचे मराठी अनुवाद आहे.

❖ जिथे जिथे 'चंदुभाऊ' किंवा 'चंद्रेश' या नावाचा उल्लेख केला आहे, तिथे वाचकांनी स्वतःचे नाव समजून वाचन करावे.

❖ पुस्तकातील कोणतीही गोष्ट जर तुम्हाला समजली नाही, तर प्रत्यक्ष सत्संगात येऊन त्याचे समाधान मिळवावे अशी नम्र विनंती.

❖ दादाश्रींच्या श्री मुखातूत निघालेले काही गुजराती शब्द जसे च्या तसे *'इटालिक्स'* मध्ये ठेवले आहेत, कारण त्या शब्दांसाठी मराठीमध्ये तसेच कोणतेही शब्द उपलब्ध नाहीत की ज्यामुळे त्याचा अर्थ पूर्णपणे समजता येईल. पण तरीही त्या शब्दाचे समानार्थी शब्द ( ) कंसात लिहिलेले आहेत.

# संपादकीय

विषय-विकाराचे वैराग्यमय स्वरुप समजण्यापासून ते थेट ब्रह्मचर्याचे स्वरुप, तसेच त्याच्या यथार्थ अखंड प्राप्तीपर्यंतच्या भावना असलेल्या वेगवेगळ्या साधकांसोबत, प्रकट आत्मवीर्यवान ज्ञानी परम पूज्य दादाश्रींच्या श्रीमुखातून निघालेली अद्‌भुत ज्ञान वाणी जी फक्त वैराग्यालाच जन्म देणारी नाही, तर विषयबीजाला निर्मूळ करुन निर्ग्रंथ बनवणारी आहे, त्याचे संकलन इथे करण्यात आले आहे. साधकांची दशा, स्थिती आणि समज यांच्या पातळीच्या आधारे निघालेल्या वाणीला अतिशय उत्कृष्ट पद्धतीने संकलित करण्यात आले आहे की ज्यामुळे वेगवेगळ्या 'स्तरावर' निघालेली गोष्ट प्रत्येक वाचकाला अखंडितपणे संपूर्ण मिळावी, अशा पद्धतीने 'समजपूर्वक प्राप्त ब्रह्मचर्य' ग्रंथाला (मूळ गुजराती भाषेत) पूर्वार्ध-उत्तरार्धात विभाजित करण्यात आले आहे.

**पूर्वार्ध खंड : १** मध्ये विषयाचे विरेचन करणारी जोरदार, सचोट आणि प्रत्येक शब्दात वैराग्य उत्पन्न करणारी वाणी संकलित केली आहे. सामान्यपणे जगात, 'विषयात सुख आहे' अशी जी भ्रांती आहे तिला तोडून टाकणारी, इतकेच नाही, तर 'खरी दिशा कुठे आहे? आणि कोणत्या दिशेत चालत आहोत?! याचे संपूर्ण भान करुन देणाऱ्या हृदयस्पर्शी वाणीचे संकलन इथे करण्यात आले आहे.

**पूर्वार्ध खंड : २** मध्ये ब्रह्मचर्याचे परिणाम ज्ञानींच्या श्रीमुखाने ऐकल्यामुळे त्यावर आफरीन झालेला साधक ब्रह्मचर्याच्या वाटेने पाऊल टाकण्याची हिंमत दाखविण्याचे साहस करतो आणि ज्ञानी पुरुषांचा योग साधून सत्संग सानिध्य, प्राप्त झाल्याने मन-वचन-कायेने अखंड ब्रह्मचर्यात राहण्यासाठी दृढ निश्चयी बनतो. ब्रह्मचर्याच्या मार्गावर चालण्यासाठी आणि विषयाच्या वटवृक्षाला मूळासकट उपटून निर्मूळ करण्यासाठी त्या मार्गात येणाऱ्या दगडांपासून ते डोंगरापर्यंतच्या विघ्नांसमोर तसेच डगमगणाऱ्या निश्चयापासून ते ब्रह्मचर्य व्रतापासून जरी च्युत झालेला असेल (मागे पडला असेल) तरी त्याला जागृतीच्या सर्वोत्कृष्ट श्रेण्या पार करवून निर्ग्रंथपद प्राप्त करवितात, इथपर्यंतची वैज्ञानिक दृष्टी ज्ञानी पुरुष उघडतात आणि फुलवतात!!!

अनंत वेळा विषय रुपी चिखलात अल्पसुखाच्या लालसेने पूर्ण माखला आणि या दलदलीत खोलवर रुतला तरीही त्यातून बाहेर निघण्याचे मन होत नाही, हे सुद्धा एक आश्चर्यच आहे ना! जे खरोखर ह्या चिखलातून बाहेर निघू पाहतात, पण मार्ग मिळत नसल्याने नाईलाजास्तव फसलेले आहेत; ज्यांना सुटण्याचीच एकमेव कामना आहे, त्यांना तर 'ज्ञानी पुरुषांचे' हे 'दर्शन' नवीनच दृष्टी प्रदान करुन सर्व बंधनातून सोडवणारे बनते.

मन-वचन-कायेच्या तमाम संगी क्रियांपासून संपूर्णपणे असंगतेच्या अनुभवाचे प्रमाण अक्रम विज्ञान प्राप्त झालेल्या विवाहितांनी सिद्ध केले आहे. विवाहीत पण मोक्षमार्ग प्राप्त करुन आत्यंतिक कल्याण साधू शकतात. 'गृहस्थाश्रमात मोक्ष!!!' हे विरोधाभासी वाटते, परंतु तरीही सिद्धांतिक विज्ञानाद्वारे विवाहित सुद्धा मार्ग प्राप्त करु शकले आहेत, हे वास्तविकतेत प्रमाणभूत रुपाने शक्य झाले आहे. अर्थात 'गृहस्थीपणा मोक्षमार्गात बाधक नाही?!' याचे प्रमाण तर असेल ना? या प्रमाणाला प्रकाशित करणारी वाणी उत्तरार्ध खंड : १ मध्ये समाविष्ट करण्यात आली आहे.

'ज्ञानी पुरुषांकडून' 'स्वरुपज्ञान' प्राप्त विवाहितांसाठी की जे विषय-विकार परिणाम आणि आत्मपरिणामाच्या सांध्यावर जागृतिच्या पुरुषार्थात आहेत, त्यांना ज्ञानी पुरुषांच्या विज्ञानमय वाणीने विषयांच्या जोखिमांसमोर सतत जागृती, विषय विकारासमोर खेद, खेद आणि खेदच तसेच प्रतिक्रमणरुपी पुरुषार्थ, आकर्षणाच्या वातावरणात बुडल्याशिवाय बाहेर निघण्याची जागृति देणारी समजचे सिद्धांतिक समज की ज्यात 'आत्म्याचे सूक्ष्मतम स्वरुप, त्याचा अकर्ता-अभोक्ता स्वभाव' तसेच 'विकार परिणाम कोणाचा? विषयाचा भोक्ता कोण? आणि भोगल्याचे डोक्यावर घेणारा कोण?' या सर्व रहस्यांचे स्पष्टीकरण कुठेही दिलेले नाही. ते इथे साध्या, सरळ आणि सहजतेने लक्षात येईल अशा शैलीत दर्शविण्यात आले आहे. ही समज थोडीशीही शर्त चूक झाल्याने सोन्याच्या कटारीसारखी बनून जाते. त्याचे सर्व जोखिम आणि निर्भयता प्रकट करणारी वाणी उत्तरार्धाच्या खंड : २ मध्ये प्रस्तुत केली आहे.

सर्व संयोगांत अप्रतिबद्धपणे विचरत राहून, महामुक्तदशेत रमलेल्या

ज्ञानी पुरुषांनी कसे विज्ञान निहाळले असेल!!! जगातील लोकांनी गोड मान्यतेमुळे विषयात सुख मानले, त्यांची दृष्टी कशा पद्धतीने विकसित केल्याने विषय संबधित सर्वच चुकीच्या मान्यता दूर होतील आणि महामुक्तदशेचे मूळ कारणस्वरुप असणारे 'भाव ब्रह्मचर्य'चे वास्तविक स्वरुप यथार्थ समजूतीने खोलवर रुजेल. विषयमुक्तिसाठी कर्तापणाची सर्व भ्रांती तुटावी तसेच ज्ञानी पुरुषांनी स्वत: जे पाहिले आहे, जाणले आहे आणि अनुभवले आहे, त्या 'वैज्ञानिक अक्रम मार्गा' च्या ब्रह्मचर्य संबंधीचे अद्‌भुत रहस्य ह्या ग्रंथात विस्फोटीत झाले आहे!

या संसारवृक्षाला मूळासकट उपटून टाकणारे, आत्म्याच्या अनंत समाधित रमणता करविणारे, निर्ग्रंथ वीतरागदशा प्राप्त करविणारे, वीतरागांनी स्वत: प्राप्त करुन इतरांनाही बोध दिला, असे हे अखंड त्रियोगी शुद्ध ब्रह्मचर्य निश्चितच मोक्ष प्राप्ती करविणारे आहे! अशा ह्या दुषमकाळात 'अक्रम विज्ञाच्या उपलब्धिमुळे आजीवन मन-वचन-कायेने शुद्ध ब्रह्मचर्ये जोपासले गेले, त्याला एकावतारी पद निश्चितच प्राप्त होईल असे आहे!

शेवटी, अशा दुषमकाळात की जिथे संपूर्ण जगातील वातावरणच विषयाग्निने पसरलेले आहे, अशा परिस्थितीत ब्रह्मचर्य संबंधित 'प्रकट विज्ञानला' स्पर्शून निघालेली 'ज्ञानी पुरुषांची' अद्‌भुत वाणी संकलित करुन विषय-मोहपासून सुटून साधनेत राहून, अखंड शुद्ध ब्रह्मचर्याच्या पालनासाठी सुज्ञ वाचकांच्या हातात हा 'समजपूर्वक प्राप्त ब्रह्मचर्य' ग्रंथ संक्षिप्त स्वरुपात प्रस्तुत करण्यात आला आहे. विषयाच्या भयंकर परिणामांपासून सुटण्यासाठी तसेच गृहस्थ दशेत राहून सर्व व्यवहार निर्भयतेने पूर्ण करण्यासाठी आणि मोक्षमार्ग निरंतरायपणे वर्तनात(अनुभवात) येईल, यासाठी 'जसे आहे तसे' वास्तविकतेला प्रस्तुत करताना, सोन्याच्या कटार स्वरुपात सांगण्यात आलेली 'समज' ला अल्प प्रमाणातही विपरीततेकडे घेऊन न जाता, सम्यक् प्रकारे त्याचा उपयोग करावा अशी प्रत्येक सुज्ञ वाचकाला अत्यंत भावपूर्वक विनंती! मोक्षमार्गात यथायोग्य पूर्णाहुती करण्यासाठी या पुस्तकाची उपयोगपूर्वक आराधना करावी हीच अभ्यर्थना।

**- डो. नीरूबहन अमीन**

# अनुक्रमणिका

## समजपूर्वक प्राप्त ब्रह्मचर्य ( पूर्वार्ध )

### खंड : १

### विषय विकाराचे स्वरुप, ज्ञानींच्या दृष्टीने



### खंड : २

### 'लग्न करायचेच नाही' असा निश्चय करणाऱ्यांसाठी मार्ग

# समजपूर्वक प्राप्त ब्रह्मचर्य ( उत्तरार्ध )

## खंड : १

## विवाहितांसाठी ब्रह्मचर्याची चावी...



## खंड : २

## आत्मजागृतिने ब्रह्मचर्याचा मार्ग



❖❖❖❖❖

# समजपूर्वक प्राप्त ब्रह्मचर्य ( पूर्वार्ध )

## खंड : 1

## विषय विकाराचे स्वरुप, ज्ञानींच्या दृष्टीने

### [ 1 ] विश्लेषण, विषयाच्या स्वरुपाचे

**प्रश्नकर्ता :** निसर्गाला जर स्त्री-पुरुषाची आवश्यकता आहे तर ब्रह्मचर्य कशासाठी दिले ?

**दादाश्री :** स्त्री-पुरुष दोघेही नैसर्गिक आहेत आणि ब्रह्मचर्याचा हिशोब हा सुद्धा नैसर्गिक आहे. मनुष्य ज्या पद्धतीने जगू पाहतो, तो स्वतः जशी भावना करतो, त्या भावनेच्या फळस्वरुपाने हे जग आहे. ब्रह्मचर्याची भावना मागील जन्मी केली असेल तर ह्या जन्मात ब्रह्मचर्याचा उदय येतो. हे जग स्वतःचे प्रोजेक्ट आहे.

**प्रश्नकर्ता :** परंतु ब्रह्मचर्य पाळल्याने काय फायदा होतो ?

**दादाश्री :** जर काही लागल्यामुळे आपल्याला रक्त निघत असेल, तर त्यास आपण बंद का करतो ? त्यात काय फायदा ?

**प्रश्नकर्ता :** जास्त रक्त निघू नये म्हणून.

**दादाश्री :** रक्त निघाले तर काय होते ?

**प्रश्नकर्ता :** शरीरात खूप अशक्तपणा येतो.

**दादाश्री :** त्याचप्रमाणे अधिक अब्रह्मचर्यामुळे शरीरास खूप अशक्तपणा येतो. हे सर्व रोग अब्रह्मचर्याचेच आहेत. कारण की तुम्ही जो आहार खाता, पीता, श्वास घेता, त्या सर्वांचा परिणाम होत, होत,

होत शेवटी त्याचे वीर्य तयार होते. जसे या दुधापासून दही तयार करतो, हे दही म्हणजे अंतिम परिणाम नाही. पुढे मग दहीपासून लोणी तयार होते, लोणीचे तुप तयार होते. म्हणजे तुप हे अंतिम परिणाम आहे. तसेच यात ब्रह्मचर्य, हे संपूर्ण पुद्गलसार आहे!

म्हणून ह्या जगातील दोन वस्तूंना वाया घालवू नये. एक म्हणजे लक्ष्मी आणि दुसरे वीर्य. जगातील लक्ष्मी(पैसे) गटारीतच जात आहे. म्हणूनच लक्ष्मी स्वत:साठी वापरु नये, विनाकारण दुरुपयोग करु नये, आणि शक्यतो ब्रह्मचर्य पाळले पाहिजे. जो आहार घेत असतो. त्याचा अर्क बनतो व शेवटी अब्रह्मचर्यामुळे नष्ट होतो. या शरीरात अशा काही नसा असतात की, ज्या वीर्याला सांभाळतात आणि हे वीर्य या शरीराला सांभाळते. अर्थातच शक्य होईल तेवढे ब्रह्मचर्य पाळले पाहिजे.

**प्रश्नकर्ता :** पण अजूनही मला ही गोष्ट समजत नाही की माणसाने ब्रह्मचर्य का पाळावे?

**दादाश्री :** मला माझी गोष्ट तुमच्यावर जबरदस्तीने ठासून बसवायची नाही. तुम्हाला स्वत:लाच ती समजायला हवी. ब्रह्मचर्य पाळू शकत नाही ही वेगळी गोष्ट आहे, परंतु ब्रह्मचर्याचे विरोधी होण्यासारखे नाहीच. ब्रह्मचर्य तर (मोक्षाला जाण्यासाठी, आत्मसाधनेसाठी) सर्वात मोठे साधन आहे.

मग ते जाऊ दया, लेट गो करा. ब्रह्मचर्य पाळू नका. मी काही अशा मताचा नाही. मी तर लोकांना सांगतो की जर तुमची इच्छा असेल तर तुम्ही खुशाल लग्न करा. कोणाला लग्न करायचे असेल तर त्यात माझी काहीच हरकत नाही.

असे आहे की, ज्याला संसारिक सुखांची गरज आहे, भौतिक सुखांची इच्छा आहे. त्याने लग्न करायला हवे. सर्वच करायला हवे पण ज्याला भौतिक सुखं आवडतच नसतील आणि सनातन सुख हवे असेल, त्याने लग्न करु नये.

**प्रश्नकर्ता :** विवाहितांना, ज्ञान उशीरा समजते ना? आणि जे ब्रह्मचर्य पाळतात, अशा लोकांना ज्ञान लवकर येते ना?

**दादाश्री :** विवाहिताने जर ब्रह्मचर्य व्रत घेतले तर त्याला आत्म्याचे सुख कसे असते हे पूर्णपणे समजते. नाहीतर तोपर्यंत त्याला सुख विषयातून येते की आत्म्यातून येते हेच समजत नाही. परंतु ब्रह्मचर्य व्रत असेल तर, त्याला आत्म्याचे अपार सुख आत अनुभवास येते. त्याचे मन चांगले राहते, शरीर वगैर सर्वकाही चांगले राहते!

**प्रश्नकर्ता :** तर दोघांचीही ज्ञानाची अवस्था सारखीच असते की त्यात काही फरक असतो? विवाहिताची आणि ब्रह्मचर्यवाल्याची?

**दादाश्री :** असे आहे की, ब्रह्मचर्य व्रतवाला कधीही घसरुन खाली पडत नाही. त्याच्यावर वाटेल तेवढे संकट आले तरी तो घसरुन पडत नाही. त्यास सेफसाईड(सलामती) म्हटले जाते.

ब्रह्मचर्य तर शरीराचा राजा आहे. जो ब्रह्मचर्यात असतो त्याची बुद्धि किती सुंदर असते, ब्रह्मचर्य हे तर संपूर्ण पुद्‌गलाचे (शरीराचे) सार आहे.

**प्रश्नकर्ता :** हे सार असार तर होत नाही ना?

**दादाश्री :** नाही, पण तो सार उडून जातो, 'युजलेस' (बेकार) होऊन जातो!!! असे सार असेल, त्याची तर गोष्टच वेगळी ना! महावीर भगवानांना बेचाळीस वर्षांपर्यंत ब्रह्मचर्यसार होते. आपण जो आहार घेत असतो त्या सर्वांच्या साराचे सार हे वीर्य आहे, हे एक्स्ट्रॅक्ट(सार) आहे. आता हे एक्स्ट्रॅक्ट जर बरोबर सांभाळता आले तर आत्मा लवकर प्राप्त होतो, संसारिक दुःखं येत नाहीत. शारिरीक दुःखं येत नाहीत, अन्य कोणतीही दुःख येत नाहीत.

**प्रश्नकर्ता :** ब्रह्मचर्य हे तर अनात्मा भागात येते ना!

**दादाश्री :** हो, पण ते पुद्‌गलसार आहे!

**प्रश्नकर्ता :** तर ते पुद्‌गलसार समयसाराला कशाप्रकारे मदत करते?

**दादाश्री :** हे पुद्‌गलसार असेल तरच समयसार होते, हे जे ज्ञान

मी तुम्हाला दिले ते तर अक्रम असल्यामुळे चालते. दुसऱ्या ठिकाणी तर असे चालत नाही, क्रमिक मार्गात तर पुद्‌गलसार पाहिजेच, नाहीतर काही लक्षातही राहत नाही. वाणी बोलताना अडखडते.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे या दोघांचा काही निमित्त नैमित्तिक संबंध आहे का?

**दादाश्री :** आहे ना! नाही कसा? तीच तर मुख्य वस्तु आहे! ब्रह्मचर्य असेल तर तुमच्या धारणेनुसार काम होते. धारणेनुसार व्रत-नियम सर्व पाळू शकतो. पुढे जाऊ शकतो आणि प्रगतीही होऊ शकते. पुद्‌गलसार तर खूप मोठी गोष्ट आहे. एकीकडे जर पुद्‌गलसार असेल तरच समयसार काढू शकतो!

लोकांना अशी खरी समज कोणीही दिली नाही ना! कारण की, लोकं स्वतःच पोलवाले(ध्येया विरुद्ध मनाचे ऐकून ते कार्य न करणे) आहेत. पूर्वीचे ऋषिमुनी तर शुद्ध होते. म्हणून ते योग्य समज देत होते.

विषयाला विष जाणलेच नाही. विष समजणारा त्याला स्पर्श करणारच नाही ना! म्हणूनच भगवंतांने म्हटले आहे की, ज्ञानाचे फळ विरति(थांबणे)! जाणल्याचे फळ काय? की तो तिथे थांबतो. विषय वासनेचे जोखिम जाणले नाही. म्हणून तिथे तो थांबलाच नाही.

भीती बाळगण्यासारखी असेल तर, या विषय विकाराची भीती बाळगण्यासारखी आहे. या जगात भीती बाळगण्यासारखी दुसरी कोणतीही जागा नाही. म्हणून विषयापासून सावध रहा. ह्या साप, विंचू, वाघापासून सावध नाही का रहात?

अनंत जन्मांच्या कमाईमुळे उच्च गोत्रात, उच्च कुळात जन्म होतो पण नंतर लक्ष्मी आणि विषयामागे अनंत जन्मांची कमाई गमावून बसतो!!!

कित्येक लोकं मला असे विचारतात की, 'ह्या विषयात असे काय आहे की विषयसुख चाखल्यानंतर मी मरणतुल्य होऊन जातो, माझे मन मरुन जाते, वाणी मरुन जाते?' मी म्हटले की, हे सगळे

मेलेलेच आहेत, पण तुम्हाला त्याचे भान रहात नाही आणि पुन्हा तीच अवस्था उत्पन्न होते. नाहीतर ब्रह्मचर्य जर कधी जपले गेले तर एकेका मनुष्यात तर पुष्कळ शक्ति आहे! आत्म्याचे ज्ञान प्राप्त करणे यास समयसार म्हटले जाते. आत्म्याचे ज्ञान प्राप्त केले आणि त्याच बरोबर जागृतीही राहिली, तर समयसार उत्पन्न झाले. आणि ब्रह्मचर्य हे पुद्‌गलसार आहे.

मन-वचन-कायेने जर ब्रह्मचर्य पाळले तर किती छान मनोबळ राहते, वचनबळ किती चांगले राहते आणि किती छान देहबळ राहते. आपल्या इथे भगवान महावीरांच्या काळापर्यंत कसा व्यवहार होता? तर एक-दोन मुले होईपर्यंत 'व्यवहार' (विषयाचा) ठेवत होते. परंतु आजच्या ह्या काळात हा व्यवहार बिघडणार आहे हे त्यांना माहीत होते, म्हणूनच त्यांना पाचवे महाव्रत (ब्रह्मचर्याचे) ठेवावे लागले.

मनुष्य असूनही या पाच इन्द्रियांच्या चिखलात का पडला आहे, हेच मोठे आश्चर्य आहे! भयंकर चिखल आहे हा तर! पण हे न समजल्यामुळे बेशुद्धावस्थेत जगाचा व्यवहार चालू राहतो, थोडासा जरी विचार केला तरीही चिखलाला समजू शकेल. परंतु ही लोकं विचारच करत नाही ना?! नुसता चिखलच आहे. तरीही मनुष्य चिखलात का पडलेला आहे? तर म्हणे, त्याला 'दुसरी स्वच्छ जागा मिळत नाही म्हणून तो अशा चिखलात लोळत आहे.'

**प्रश्नकर्ता :** अर्थात चिखलाच्या बाबतीत अज्ञानताच आहे ना?

**प्रश्नकर्ता :** हो, त्या बाबतीत त्याला अज्ञानता आहे. म्हणूनच चिखलात लोळत आहे. पण तरीही जर चिखलाला समजण्याचा प्रयत्न केला तर समजेल असे आहे, परंतु तो स्वतः समजण्याचा प्रयत्नच करत नाही ना!

या जगात निर्विषयी विषय आहेत. या शरीराच्या आवश्यकतेसाठी जे काही डाळ-भात, भाजी पोळी, जे मिळेल ते खा. ते विषय नाहीत. विषय केव्हा म्हटले जाते? जेव्हा तुम्ही लुब्धमान व्हाल तेव्हा त्यास विषय म्हटले जाते. अन्यथा ते विषय म्हटले जात नाही, ते निर्विषयी

विषय आहेत. अर्थात ह्या जगात जे डोळ्यांनी दिसते ते सर्वच विषय नाहीत. तुम्ही जर त्यात लुब्धमान झालात तरच त्यास विषय म्हटले जाते. आम्हांला कोणताही विषय स्पर्शत नाही.

हा कोळी जाळे विणतो, मग स्वतः त्यात फसतो. याचप्रमाणे संसाररुपी जाळे स्वतःच विणलेले आहे. मागील जन्मी स्वतः मागणी केली होती. बुद्धीच्या आशयात आपण टेंडर भरला होता की, एक स्त्री तर हवीच. दोन-तीन रुम असावेत, एखादा मुलगा आणि एखादी मुलगी, नोकरी एवढेच पाहिजे. त्या बदल्यात बायको तर मिळालीच मिळाली, पण सासू-सासरे, मेहुणा-मेहुणी, मावस सासू, चुलत सासू, आते सासू, मामे सासू,... किती फसवा फसवी!!! एवढी सारी झंझट सोबत येईल असे माहित असते तर ही मागणीच केली नसती कधी! आपण तर टेंडर भरले होते फक्त एका बायकोचे, मग हे सर्व कशासाठी दिले? तेव्हा निसर्ग म्हणतो, 'भाऊ, तिला एकटीला देऊ शकत नाही. मामे सासू, आते सासू हे सर्व सोबत द्यावे लागते त्याशिवाय तुम्हाला करमणार नाही. सर्व पलटन सोबत असेल तेव्हाच खरी मजा येते!'

आता तुला संसारात काय-काय पाहिजे? ते सांग ना!

**प्रश्नकर्ता :** मला तर लग्नच करायचे नाही.

**दादाश्री :** हा देहच किती त्रासदायक आहे ना? पोट दुखते तेव्हा ह्या शरीराला कसे होते? मग जर दुसऱ्यांच्या दुकानापर्यंत व्यापार वाढवला(लग्न केले) तर काय होईल? किती त्रास वाढेल. आणि पुन्हा दोन-चार मुले होतील. बायको एकटी असेल तर ठीक आहे, ती नीट राहील परंतु ही चार मुले! मग काय होईल? उपाधीचा अंतच नाही!

योनीमधून जन्म घेतो. तेव्हा योनित किती भयंकर दुःखात राहावे लागते आणि जेव्हा मोठा होतो तेव्हा पुन्हा योनिकडेच वळतो. या जगाचा व्यवहारच असा आहे. कोणीही खरे शिकवलेच नाही ना! आई-वडील सुद्धा सांगतात की लग्न करा आता. आणि हे आई-वडिलांचे कर्तव्यही आहे ना? पण कोणीही खरा सल्ला देत नाही की यात असे दुःख आहे.

लग्न हे तर खरोखरचे बंधन आहे. म्हशीला गोठ्यात कोंडण्यासारखी अवस्था होते. अशा झंझटीत फसू नये हे उत्तम, फसले असाल तरी त्यातून सूटता आले तर अति उत्तम आणि नाहीच तर शेवटी फळ चाखल्यानंतर तरी निघून जायला हवे!!!

एक भाऊ मला सांगत होता की, माझ्या बायकोशिवाय मला ऑफिसमध्ये करमत नाही.' अरे, जर कधी तिच्या हाताला पू झाला तर तू चाटशील का? नाही? मग काय बघून स्त्रीवर मोहित होतोस?! संपूर्ण शरीरच पू ने भरलले आहे. ही गोणी (शरीर) कशाची आहे, याचा विचार नाही येत का? मनुष्याला आपल्या पत्नीवर प्रेम आहे त्याहीपेक्षा, जास्त प्रेम डुक्कराला डुक्करीनीवर असते. याला काय प्रेम म्हणायचे?

ही तर निव्वळ पाशवताच आहे! प्रेम कशास म्हणतात की जे कधी वाढत नाही आणि कधी कमीही होत नाही, त्याला प्रेम म्हणतात. ही तर सर्व आसक्ति आहे.

विषयभोग तर मात्र खरकटेच आहे. संपूर्ण जगाचे खरकटे आहे. आत्म्याचा आहार असा असेल का? आत्म्याला बाहेरील कोणत्याही वस्तुची आवश्यकता नाही, आत्मा तर निरालंब आहे. कोणत्याही अवलंबनाची त्याला गरज नाही.

भ्रांतीरसात हे जग एकाकार झाले आहे. भ्रांतीरस म्हणजे खरोखर रस नाही, तरीही मानून घेतले आहे! न जाणो काय मानून घेतले आहे! ह्या सुखाचे जर वर्णन करायला गेलो तर माणसाला उलट्या येऊ लागतील!!!

या शरीराची राख तयार होते, आणि ह्या राखेच्या परमाणूं पासून पुन्हा नवीन शरीर तयार होते. अशा अनंत जन्माच्या राखेचा हा परिणाम आहे. फक्त खरकटेच आहे! हे खरकट्याचे खरकटे आणि त्याचेही पुन्हा खरकटे! त्याची तीच राख, तेच परमाणू सर्व त्यातूनच पुन्हा पुन्हा निर्माण होत राहते. भांडयाला दुसऱ्या दिवशी घासले तर स्वच्छ दिसतात पण जर घासल्याशिवाय रोज त्यातच खात राहिलो तर ते घाणेरडे नाही का?

अरे, कितीही छान खीर खाल्ली असेल, पण जर उलटी झाली तर ती खीर कशी दिसते? हातात घेऊ शकु अशी सुंदर दिसते का? वाटी स्वच्छ असेल, खीरही छान असेल, पण खाल्ल्यांनतर त्याच खीरीची उलटी झाली, आणि ती जर पुन्हा खायला सांगितली तर तुम्ही खाणार नाही आणि काय म्हणाल की, 'जे व्हायचे असेल ते होऊ दे, पण मी काही खाणार नाही. अर्थात हे सर्व भान राहत नाही ना!!!

पाच इन्द्रियांच्या विषयात फक्त जीभेचा विषयच तेवढा खरा विषय आहे. दूसरे सर्व तर नकली आहेत. शुद्ध विषय असेल तर हा एकच! फर्स्ट क्लास हापूसचे आंबे असतील, तर कसा स्वाद येईल?! भ्रांतीतला जर कोणता शुद्ध विषय असेल तर फक्त हा एकच आहे.

विषय तर संडास आहे. नाकातून, कानातून, तोंडातून या सर्वांमधून जे-जे निघते, ते सर्व संडासच आहे. डिस्चार्ज हे सुद्धा संडासच आहे. जो पारिणामिक भाग आहे, तो संडास आहे परंतु तन्मायाकार झाल्याशिवाय गलन होत नाही.

विचारशील मनुष्याने विषयात सुख कशाप्रकारे मानले आहे, त्याचेच मला नवल वाटते! विषयाचे पृथक्करण केले तर खरुजाला खाजवण्यासारखे आहे. आम्हाला तर खूप-खूप विचार येतात आणि वाटते की अरेरे! अनंत जन्म पुन्हा-पुन्हा हेच केले?! जे काही आपल्याला आवडत नाही, ते सर्वच विषयामध्ये आहे. नुसता दुर्गंध आहे. डोळ्यांना पाहायला आवडत नाही. नाकाने सुंघायला आवडत नाही. तू सुंघून पाहिले का कधी? सुंघून पहायचे होते ना? तेव्हा कुठे वैराग्य येईल. कानालाही आवडत नाही. फक्त त्वचेला आवडते.

विषय हा बुद्धीपूर्वकचा खेळ नाही, ही तर केवळ मनाची पीळ आहे.

मला तर या विषयात एवढी घाण दिसते की मला अजिबात, जरा सुद्धा त्या बाजूचा विचार येत नाही. मला कधीही विषयासंबंधी विचार येतच नाहीत. मी (ज्ञानात) इतके सर्व पाहिले आहे की मला मनुष्य आरपार दिसतात.

मनुष्याला रोंग बिलीफ (चुकीची मान्यता) आहे की, विषयात सुख आहे. आता जर त्याला विषयापेक्षाही उच्च सुख मिळाले तर विषयात सुख वाटणार नाही! खरे तर विषयात काहीच सुख नाही पण देहधारीला व्यवहारात सुटकाच नाही. नाही तर जाणून बुजून गटारीचे झाकण कोण उघडेल? विषयात जर सुख असते तर चक्रवर्ती राजे इतक्या सर्व राण्या असूनही सुखाच्या शोधात निघाले नसते! या ज्ञानाने तर इतके उच्च प्रकारचे सुख मिळते. तरी सुद्धा हे ज्ञान मिळाल्यानंतर लगेचच विषय जात नाहीत. पण हळूहळू निघून जातात. पण तरी स्वतःने मात्र असा विचार तर करायला हवा की विषयात किती घाण आहे!

पुरुषाला स्त्री आहे असे दिसत असेल तर पुरुषात रोग आहे म्हणूनच 'स्त्री' आहे असे दिसते. पुरुषात रोग नसेल तर त्याला स्त्री दिसत नाही. (केवळ त्याचा आत्माच दिसतो)

कित्येक जन्मांपासून मोजले तर पुरुषांनी कितीतरी स्त्रियांशी लग्न केले आणि स्त्रियांनीही पुरुषांशी लग्न केले पण तरीही अजून त्यांचा विषयाचा मोह तुटत नाही. तेव्हा यातून ते केव्हा पार येतील?! त्यापेक्षा होऊन जा एकटे म्हणजे मग कायमची झंझटच मिटून जाईल ना?!

खरे तर ब्रह्मचर्य हे समजून पाळणे योग्य आहे. ब्रह्मचर्याचे फळ जर मोक्ष मिळत नसेल तर ते ब्रह्मचर्य सर्व खच्ची केल्यासारखेच आहे. पण तरीही ब्रह्मचर्याने शरीर निरोगी राहते, बळकट होते, सुंदर होते, आयुष्य वाढते! बैल सुद्धा धुष्टपुष्ट होऊन जगतो ना?

**प्रश्नकर्ता :** लग्न करण्याची इच्छाच होत नाही मला.

**दादाश्री :** हो का? मग लग्न केल्याशिवाय चालेल?

**प्रश्नकर्ता :** हो, माझी तर ब्रह्मचर्याचीच भावना आहे. त्यासाठी खूप शक्ति द्या, समज द्या मला.

**दादाश्री :** त्यासाठी भावना करावी लागते. तू दररोज बोलायचे की, 'हे दादा भगवान! मला ब्रह्मचर्य पाळण्याची शक्ति द्या!' आणि जर विषयाचा विचार आला तर त्यास लगेच उपटून टाकायचे. नाहीतर

त्याचे बीज पडते. हे बीज दोन दिवस राहिले मग तर मारुनच टाकते. पुन्हा उगवते, अर्थात विचार उगताच मूळासकट उपटून फेकून द्यावे. आणि कोणत्याही स्त्री बरोबर दृष्टी मिळवू नये. दृष्टी आकर्षिली जात असेल तर बाजूला करावी आणि दादाजींना आठवून माफी मागावी. या विषयाची आराधना करण्यासारखी नाहीच, असा भाव निरंतर राहिला तर शेत साफ होते. आताही जर कोणी आमच्या सानिध्यात राहिला तर त्याचे सर्व पूर्ण होईल.

ज्याला ब्रह्मचर्यच पाळायचे असेल, त्याने तर संयमाला अनेक प्रकारे तपासून घेतले पाहिजे, परीक्षा करुन पहायला हवी, आणि जर घसरुन पडू असे वाटत असेल तर मग लग्न केलेले उत्तम. पण तेही संयमपूर्वक असायला हवे, जिच्याशी लग्न करायचे असेल तिला सांगून द्यावे की, मला असे संयमपूर्वक रहायचे आहे.

## [ 2 ] विकारांपासून विमुक्तीची वाट...

**प्रश्नकर्ता :** 'अक्रम मार्गात' विकारांना दूर करण्याचे साधन कोणते ?

**दादाश्री :** इथे विकारांना दूर करायचे नाही. हा मार्ग वेगळा आहे. कित्येक लोकं इथे मन-वचन-कायाचे ब्रह्मचर्य घेतात, आणि कित्येक पत्नीवाले (विवाहीत) आहेत, त्यांना आम्ही मार्ग दाखविला आहे त्याप्रमाणे ते समाधान आणतात. मुळात 'इथे' विकारी पदच नाही, पदच 'इथे' निर्विकारी आहे! विषय हे विष आहे परंतु अगदीच विष नाही. विषयात असलेला नीडरपणा (निर्भयपणा) हे विष आहे. विषय तर लाचारीमुळे, म्हणजे जर कोणी चार दिवसाचा उपाशी असेल आणि पोलिसवाल्याने पकडून त्याला मांसाहार करायला भाग पाडले आणि त्यामुळे त्याला मांसाहार करावा लागला तर त्यास हरकत नाही. स्वत:च्या स्वतंत्र मर्जीनुसार नसावे. पोलिसवाल्याने पकडून जेलमध्ये बसवले तर तिथे बसावेच लागेल ना तुम्हाला? तिथे काही दुसरा उपाय आहे? म्हणजे कर्म त्याला पकडतो आणि कर्मच त्याला पछाडतो. त्यात आपण नाही म्हणू शकत नाही ना! बाकी जिथे विषयाची गोष्ट येते, तिथे धर्म

नसतो. धर्म निर्विकारात असतो. थोड्या प्रमाणात जरी धर्म असला तरी चालेल परंतु धर्म निर्विकारी असायला पाहिजे.

**प्रश्नकर्ता :** गोष्ट खरी आहे, परंतु त्या विकारी किनाऱ्यापासून निर्विकारी किनाऱ्यापर्यंत पोहोचण्यासाठी एखादी होडी तर असायला हवी ना?

**दादाश्री :** हो, त्यासाठी ज्ञान असते, त्यासाठी तसेच गुरु भेटले पाहिजे. गुरु विकारी नसावेत. गुरु जर विकारी असतील तर पूर्ण समुहच नरकात जाईल. पुन्हा मनुष्यगतिही बघायला मिळत नाही. गुरूंना विकार शोभत नाही.

कोणत्याही धर्माने विकारांचा स्वीकार केलेला नाही. विकाराचा स्वीकार करणाऱ्याला वाममार्गी म्हटले जाते. पूर्वीच्या काळी वाममार्गी होते, विकारासोबत ब्रह्म शोधण्यास निघाले होते.

**प्रश्नकर्ता :** ते सुद्धा एक विकृत स्वरुपच म्हटले जाईल ना?

**दादाश्री :** हो विकृतच ना! म्हणूनच वाममार्गी म्हटले ना! वाममार्गी म्हणजे स्वत: मोक्षाला जात नाही आणि लोकांनाही मोक्षाला जाऊ देत नाही. स्वत: अधोगतित जातात आणी लोकांनाही अधोगतित घेऊन जातात.

**प्रश्नकर्ता :** कामवासनेचे सुख क्षणिकच आहे हे माहित असून सुद्धा, कधी तरी त्याची प्रबळ इच्छा होण्याचे कारण काय? आणि त्यावर अंकुश कशाप्रकारे ठेवू शकतो?

**दादाश्री :** कामवासनेचे स्वरुप जगाने जाणलेलेच नाही. कामवासना कशामुळे उत्पन्न होते, हे जर जाणून घेतले तर ताब्यात ठेवता येते. पण वस्तुस्थितीत ते कुठून उत्पन्न होते, हे जाणतच नाही. तर कसे ताब्यात ठेऊ शकणार? कोणीही ताब्यात ठेऊ शकत नाही. ज्याने ताब्यात ठेवले आहे असे जे दिसते, ते तर पूर्वी केलेल्या भावनेचे फळ आहे. कामवासनेचे स्वरुप कुठून उत्पन्न झाले, ही उत्पन्नाची अवस्था जाणली, आणि तिथेच जर टाळा लावला तरच त्यावर अंकुश ठेवू शकतो. त्याशिवाय तुम्ही

टाळे लावा किंवा वाटेल ते उपाय करा त्याने काहीच होऊ शकणार नाही. कामवासना नको असेल तर आम्ही त्यासाठी मार्ग दाखऊ.

**प्रश्नकर्ता :** विषयांपासून परावृत्त होण्यासाठी ज्ञान ही महत्वाची वस्तु आहे.

**दादाश्री :** सर्व विषयांतून सुटण्यासाठी ज्ञान हे एकच अति आवश्यक आहे. अज्ञानतेमुळेच सर्व विषय चिकटलेले आहेत. म्हणून वाटेल तेवढे टाळे लावले तरी त्याच्याने विषय काही बंद होणार नाही. इन्द्रियांना टाळा लावणाऱ्यांना मी पाहिले आहे. पण तसे केल्याने विषय काही बंद होत नाही.

ज्ञानाने सर्व (दोष) निघून जातात. ज्ञानामुळे आपल्या या सर्व ब्रह्मचारींना विषयसंबंधित एक विचार सुद्धा येत नाही, ज्ञानाच्या प्रभावाने.

**प्रश्नकर्ता :** सायकोलॉजी असे सांगते की, एकदा जर तुम्ही पोटभर आईस्क्रीम खाल्ले. तर त्यानंतर तुम्हाला खायचे मनच होणार नाही.

**दादाश्री :** जगात असे होऊच शकत नाही. असे पोटभर खाल्ल्याने तर पुन्हा खायचे मन होणारच. पण जर तुम्हाला खायचे नसेल आणि जबरदस्तीने सारखे सारखे खाऊ घातले, ठासून ठासून खायला घातले तेव्हा मग उल्ट्या होतात आणि तेव्हा खायचे बंद होईल. पोटभर खाल्ल्याने तर उलट पुन्हा खाण्याची इच्छा होते. या विषयाच्या बाबतीत तर नेहमी जस-जसे विषय भोगत जातो, तस-तसे ते आणखी पेट घेत जाते.

विषय न भोगल्यामुळे थोडे दिवस त्रास होतो, कदाचित महीने, दोन महीने. परंतु त्यानंतर अपरिचयामुळे मनुष्य (विषय) पूर्णपणे विसरुनच जातो. आणि भोगणारा मनुष्य वासना काढू शकतो ह्या गोष्टीत तथ्य नाही. म्हणूनच आपल्या लोकांचा, शास्त्रांचा शोध आहे की हा ब्रह्मचर्याचा मार्गच उत्तम आहे. अर्थात सर्वात मोठा उपाय, म्हणजे अपरिचय!

एकदा जर त्या वस्तूपासून दूर राहिलो, वर्षभर किंवा दोन वर्षांसाठी

दूर राहिलो तर मनुष्य त्या वस्तुला विसरुनच जातो. म्हणजेच मनाचा स्वभाव कसा आहे? दूर राहिले तर विसरुन जाते. जवळ आल्यावर पुन्हा ओढाताण सुरु होते. मनाचा परिचय तुटला. 'आपण' वेगळे राहिलो म्हणून मन सुद्धा त्या वस्तुपासून दूर राहिले, म्हणून मग ते कायमसाठी विसरते. त्याला आठवणही येत नाही. नंतर आपण सांगितले तरी ते त्या बाजूला वळत नाही. हे तुम्हाला समजतय का? तू जर तुझ्या मित्रापासून दोन वर्षांसाठी दूर राहिला, तर तुझे मन त्याला विसरुन जाईल.

**प्रश्नकर्ता :** जेव्हा आपण मनाला विषय भोगण्यासाठी सुट देत असतो, तेव्हा त्यात ते नीरस राहते, आणि जेव्हा विषय भोगण्याकडे कंट्रोल करतो, तेव्हा ते जास्त उसळते, आकर्षित होते, तर त्याचे काय कारण?

**दादाश्री :** असे आहे की, याला आपण मनाचा कंट्रोल म्हणू शकत नाही. जो आपला कंट्रोल स्वीकारत नसेल तर तो कंट्रोलच नाही. कंट्रोलर असायला हवा ना? स्वतः कंट्रोलर असेल तर कंट्रोल स्वीकारेल. स्वतः कंट्रोलर नाही म्हणून मन ऐकत नाही, मन तुमचे ऐकत नाही ना?

मनाला थांबवायचे नाही. मनाच्या कारणांना नियंत्रित करायचे आहे. मन तर स्वतःच एक परिणाम आहे. तो परिणाम दाखवल्याशिवाय राहणार नाही, परिक्षाचा परिणाम आहे, परिणाम बदलू शकत नाही, परीक्षेला बदलायचे आहे. ज्याच्याने हे परिणाम उभे राहतात त्या कारणांना बंद करायचे आहे. मग ही कारणे कशी शोधायची? मन कशामुळे उत्पन्न झाले? तेव्हा म्हणे, विषयात चिकटलेले आहे. 'कुठे चिकटलेले आहे? हे शोधून काढायला हवे. आणि मग तिथे कापायचे.

**प्रश्नकर्ता :** वासना सोडण्यासाठी सर्वात सोपा उपाय कोणता?

**दादाश्री :** 'माझ्याजवळ या.' हाच उपाय. दुसरा काय उपाय? वासना जर तुम्ही स्वतः सोडायला जाल तर दुसरी वासना घुसेल. कारण अवकाश (पोकळी) तसे राहत नाही. तुम्ही एक वासना सोडली म्हणून तिथे अवकाश निर्माण होईल. आणि मग तिथे दुसरी वासना घुसेल.

**प्रश्नकर्ता :** हे क्रोध-मान-माया-लोभ हे जे तुम्ही सांगितले ना, तर हा विषय कशात येतो? 'काम' कशात येते?

**प्रश्नकर्ता :** विषय वेगळे आहेत आणि हे कषाय वेगळे आहेत. जर आपण विषयांची मर्यादा ओलांडली, मर्यादेपेक्षा जास्त मागितले, ते लोभ आहे.

## [ 3 ] माहात्म्य ब्रह्मचर्येचे!

**प्रश्नकर्ता :** जो बाल ब्रह्मचर्यचारी असतो तो जास्त उत्तम म्हटला जातो की जो लग्नानंतर ब्रह्मचर्य पाळतो तो जास्त उत्तम म्हटला जातो?

**दादाश्री :** बाल ब्रह्मचारीची तर गोष्टच वेगळी ना! परंतु आजचे बाल ब्रह्मचारी कसे असतात? हा काळ खराब आहे. त्यांच्या जीवनात आतापर्यंत जे घडले आहे ते जर तुम्ही वाचाल तर लगेचच तुमचे डोके दुखू लागेल.

तुम्हाला जर ब्रह्मचर्य पाळायचे असेल तर तुम्हाला उपाय सांगतो. तो उपाय तुम्ही केला पाहिजे. नाहीतर तुम्ही ब्रह्मचर्य पाळलेच पाहिजे असे काही अनिवार्य नाही. हे तर आत ज्याच्या कर्माचा उदय असेल त्याच्याकडून पाळले जाते. ब्रह्मचर्य व्रत घेणे हे तर त्यांच्या पूर्वकर्माचा उदय असेल तर पाळले जाऊ शकते. पूर्वी भावना केली असेल तर पाळले जाईल. किंवा मग तुम्ही पालन करण्याचा निश्चय केला तर पाळले जाईल. आम्ही काय सांगतो की, तुमचा पक्का निश्चय पाहिजे आणि सोबत आमचे वचनबळ आहे, त्यामुळे ब्रह्मचर्य पाळणे शक्य आहे.

**प्रश्नकर्ता :** देहासोबत जी कर्म चार्ज होऊन आलेली असतील त्यात बदल तर होऊ शकत नाही ना?

**दादाश्री :** नाही, काहीच बदल होत नाही. तरीही विषय ही अशी वस्तु आहे की ज्ञानी पुरुषाच्या आज्ञेमुळे फक्त यात मात्र बदल घडू शकतो. पण तरीही हे व्रत सर्वांनाच देता येत नाही. आम्ही अमुकच माणसांना हे व्रत दिले आहे. ज्ञानींच्या आज्ञेने सर्व काही बदलू शकते. समोरच्याला फक्त निश्चयच करायचा आहे की वाटेल ते होऊ दे, परंतु

हे (विषय) मला नकोच. तेव्हा मग आम्ही त्याला आज्ञा देतो आणि आमचे वचनबळ काम करते. म्हणून त्याचे चित्त मग इतरत्र कुठेही जात नाही.

हे ब्रह्मचर्य जर कोणी पाळले आणि जर शेवटपर्यंत यातून पार उतरला तर ब्रह्मचर्य ही तर खूपच मोठी गोष्ट आहे. हे 'दादाई ज्ञान', 'अक्रम विज्ञान' आणि त्यासोबत ब्रह्मचर्य, हे सर्व असेल, तर त्याला आणखी काय हवे? एक तर हे 'अक्रम विज्ञान'च असे आहे की जर कधी हा अनुभव, विशेष परिणाम प्राप्त करु शकला, तर तो राजांचाही राजा आहे. संपूर्ण जगाच्या राजांना पण तिथे नमस्कार करावा लागेल!

**प्रश्नकर्ता :** आता तर शेजारी सुद्धा नमस्कार करत नाही!

**प्रश्नकर्ता :** समजल्यानंतर सुद्धा संसारातील विषयांमध्ये मन आकर्षित होत राहते. खरे-खोटे काय आहे हे सर्व समजतो, तरीही विषयांमधून सुटू शकत नाही. तर त्यावर उपाय काय?

**दादाश्री :** जी समज क्रियाकारी असते तीच खरी समज म्हटली जाते. इतर सर्व वांझ समज म्हटली जाते.

**प्रश्नकर्ता :** ही समज क्रियाकारी होण्यासाठी, काय प्रयत्न करावा?

**दादाश्री :** मी तुम्हाला सविस्तर समजावतो. मग ती समजच क्रिया करीत राहील. तुम्ही काहीच करायचे नाही. तुम्ही ढवळाढवळ करायला जाल तर ते उलट जास्त बिघडेल. जे ज्ञान, जी समज क्रियाकारी असेल, तीच खरी समज आणि तेच खरे ज्ञान आहे.

या जगात जर कुठल्या गोष्टीचीं निंदा करण्यासारखी असेल तर ते अब्रह्मचर्य आहे. इतर सर्व गोष्टी इतक्या निंदा करण्यासारख्या नाहीत.

**प्रश्नकर्ता :** परंतु मानसशास्त्री तर असे सांगतात की, विषय बंद होऊ शकतच नाही, शेवटपर्यंत राहतो. त्यामुळे मग वीर्याचे उर्ध्वगमन होणारच नाही ना?

**दादाश्री :** मी काय म्हणतो की, विषयाचा अभिप्राय बदलला की विषय राहतच नाही! जोपर्यंत (विषयसंबंधी) अभिप्राय बदलत नाही

तोपर्यंत वीर्याचे उर्ध्वगमन होतच नाही. आपल्या इथे तर आता सरळ आत्मपक्षातच टाकून द्यायचे आहे, त्याचेच नाव उर्ध्वगमन आहे! विषय बंद केल्याने त्याला आत्मसुखाचा अनुभव होतो. आणि विषय बंद झाला म्हणजे वीर्याचे उर्ध्वगमन होईलच. आमची आज्ञाच अशी आहे की विषय बंद होऊन जातो.

**प्रश्नकर्ता :** आज्ञेत काय असते? व्यक्ति बंद करायचे?

**दादाश्री :** व्यक्ति विषय बंद करा असे आम्ही सांगतच नाही. मन-बुद्धि-चित्त आणि अहंकार ब्रह्मचर्यात राहतील असे असायला हवे. आणि मन-बुद्धि-चित्त आणि अहंकार ब्रह्मचर्याच्या पक्षात आले म्हणजे मग स्थूळ तर आपोआपच येईलच. तुझ्या मन-बुद्धि-चित्त आणि अहंकाराला फिरव. आमची आज्ञा अशी आहे की हे चारही फिरुनच जातात!

**प्रश्नकर्ता :** हे वचनबळ ज्ञानींना कसे प्राप्त झाले असेल?

**दादाश्री :** स्वत: निर्विषयी असतील तरच वचनबळ प्राप्त होते, अन्यथा विषयाचे विरेचन करवू शकेल असे वचनबळ असतच नाही ना! मन-वचन-कायेने संपूर्णपणे निर्विषयी असतील तेव्हा त्यांच्या शब्दाने विषयाचे विरेचन होते.

# खंड : 2
# 'लग्न करायचेच नाही' असा निश्चय करणाऱ्यांसाठी मार्ग

## [ 1 ] विषयापासून कोणत्या समजमुळे सुटू शकतो?

**प्रश्नकर्ता :** माझी लग्न करण्याची इच्छा नाही, परंतु आई-वडील तसेच इतर नातेवाईक लग्नासाठी दबाव टाकत आहेत. तर मी लग्न करावे की नाही?

**दादाश्री :** तुम्हाला जर लग्न करण्याची इच्छाच नसेल तर आपले हे 'ज्ञान' तुम्ही घेतलेले आहे म्हणून तुम्हाला ते जमेल. या ज्ञानाच्या प्रतापाने सर्वकाही शक्य होईल असे आहे. मी तुम्हाला समजावेल की कशाप्रकारे वागावे आणि त्यात जर तुम्ही पार उतरले, तर अति उत्तम. तुमचे कल्याण होईल!!!

ब्रह्मचर्य व्रत घेण्याचा विचार आला आणि जर त्याचा निश्चय पक्का झाला तर त्यासारखी मोठी गोष्ट काय असेल? तो तर सर्व शास्त्रं समजून गेला! ज्याने निश्चय केला की आता मला सुटायचेच आहे, त्याला सर्व शास्त्रं समजली. विषयाचा मोह असा आहे की निर्मोहीला सुद्धा तो मोही बनवतो. अरे, साधु-आचार्यांना सुद्धा तो विचलित करुन टाकतो!

**प्रश्नकर्ता :** ब्रह्मचर्याचा निश्चय केला आहे, त्याला आणखी मजबूत करण्यासाठी काय करायला हवे?

**दादाश्री :** पुन्हा-पुन्हा निश्चय करायचा आणि 'हे दादा भगवान! मी निश्चय मजबूत करतो, मला निश्चय मजबूत करण्यासाठी शक्ति द्या.' असे बोलल्याने शक्ति वाढते.

**प्रश्नकर्ता :** विषयाचे विचार आले तरीही त्यास पहात राहायचे?

**दादाश्री :** विचारांना पहातच राहायचे. नाहीतर काय त्यांना साठवून ठेवायचे?

**प्रश्नकर्ता :** उडवून नाही का टाकायचे?

**दादाश्री :** पहातच राहायचे, पाहिल्यानंतर आपण चंद्रेशला सांगायचे की यांचे प्रतिक्रमण कर. मन-वचन-कायेने विषय विकारी दोष इच्छा, चेष्टा-चाळे, हे सर्व जे दोष झाले असतील, त्यांचे प्रतिक्रमण करावे लागते. विषयाचे विचार येतात परंतु स्वतः त्यांच्यापासून वेगळा राहतो, त्यावेळी किती आनंद होतो?! जर विषयातून कायमचा सूटला तर किती आनंद होईल?

मोक्षाला जाण्याचे चार आधारस्तंभ आहेत. ज्ञान-दर्शन-चारित्र्य आणि तप. आता तप केव्हा करावे लागते? मनात विषयाचे विचार येत असतील आणि स्वतःचा दृढ निश्चय असेल की मला विषय भोगायचाच नाही. तर याला भगवंतांनी तप म्हटले आहे. स्वतःची किंचितमात्र इच्छा नसेल, तरीही विचार येत असतील तिथे तप करायचे आहे.

अब्रह्मचर्याचे विचार येत असतील, परंतु सतत ब्रह्मचर्याची शक्ति

मागत असेल, ही फार उत्तम गोष्ट आहे. ब्रह्मचर्याची शक्ति सतत मागत राहिल्याने कोणाला दोन वर्षांनी, तर कोणाला पाच वर्षांनी ब्रह्मचर्य उदयात येते. ज्याने अब्रह्मचर्य जिंकले त्याने संपूर्ण जग जिंकले, ब्रह्मचर्य पाळणाऱ्यांवर तर शासनदेव-देवी खूप प्रसन्न असतात.

सावध राहण्यासारखे तर विषयाच्या बाबतीत आहे. एक विषय तेवढे जिंकले तरी पुष्कळ झाले. त्याचा विचार येण्या अगोदरच त्याला उपटून टाकावे लागते. आत विचार आला की लगेच उपटून टाकावे. दुसरी गोष्ट, एखाद्या सोबत सहजही दृष्टीस दृष्टी मिळाली तर, दृष्टी लगेचच बाजूला करावी लागते. नाहीतर ते रोपटे थोडेसे जरी वाढले तर त्यातून पुन्हा बी पडते. म्हणूनच त्या रोपट्याला उगवतानाच उपटून टाकावे लागते.

ज्याच्या संगतीत राहून आपण फसले जाऊ असे असेल तर त्यापासून खूपच दूर राहायला हवे, नाहीतर एकदा जर फसलो तर पुन्हा पुन्हा फसतच राहतो, म्हणून तिथून पळ काढावा. घसरुन पडण्यासारखी जागा असेल तिथून पळ काढावा, म्हणजे मग आपण घसरणार नाही. सत्संगात इतर 'फाईली' तर भेटत नाहीत ना? एक समान विचारवालेच सर्व भेटतात ना?

मनात थोडासा जरी विषयाचा विचार आला की ताबडतोब त्याला उपटून फेकून दिले पाहिजे. आणि जर कुठे आकर्षण झाले तर त्याचे लगेचच प्रतिक्रमण केले पाहिजे. या दोन शब्दांना ज्याने पकडले त्याला कायम ब्रह्मचर्य राहणार. या बियांचा स्वभाव कसा आहे की त्या पडतच राहतात. डोळे तर निरनिराळे पाहत राहतात. त्यामुळे आत बी पडते. म्हणून मग त्याला उपटून टाकावे. जोपर्यंत बी रुपाने आहे तोपर्यंत उपाय आहे, नंतर काही होऊ शकत नाही.

सर्व स्त्रिया काही आपल्याला आकर्षित करीत नाहीत. ज्या आकर्षित करतात तो तुमचा मागील जन्माचा हिशोब आहे; म्हणून तिथे उपटून फेकून द्या, स्वच्छ करुन टाका. आपल्या ज्ञानानंतर काही अडचण येत नाही. फक्त एका विषयाच्या बाबतीत आम्ही सावध करतो. दृष्टी मिळवणे हाच गुन्हा आहे, आणि हे समजल्यानंतर जबाबदारी खूप वाढते, म्हणून कोणासोबतही दृष्टी मिळवायची नाही.

भावनिद्रा येते की नाही? भावनिद्रा आली तर जग तुला चिकटले. जर भावनिद्रा आली, तर त्याच व्यक्तिच्या शुद्धात्म्याजवळ ब्रह्मचर्यासाठी शक्ति मागवी की, 'हे शुद्धात्मा भगवान, मला संपूर्ण जगासोबत ब्रह्मचर्य पालन करण्याची शक्ति द्या.' आमच्याजवळ जर शक्ति मागितली तर उत्तमच आहे, परंतु ज्या व्यक्तिसोबत व्यवहार झाला आहे तिथेच डायरेक्ट माफी मागणे हे अति उत्तम आहे.

**प्रश्नकर्ता :** नजरेस नजर मिळाली तर काय करायचे?

**दादाश्री :** आपल्या जवळ जे प्रतिक्रमणाचे साधन आहे, त्याने धुऊन टाकायचे. नजर मिळाली तर लगेचच प्रतिक्रमण केलेले उत्तम. म्हणून तर म्हटले आहे ना की सुंदर स्त्रीचा फोटो किंवा मूर्ति ठेवू नका.

**प्रश्नकर्ता :** विषयात सर्वात जास्त गोडवा मानला गेला आहे, ते कोणत्या आधारावर मानला गेला आहे?

**दादाश्री :** त्यात त्याला गोडवा वाटला आणि इतर ठिकाणी त्याने गोडवा पाहिलेलाच नाही, म्हणूनच त्याला विषयात खूप गोडी वाटते. खरे बघायला गेलो तर सर्वात जास्त घाण इथेच आहे, पण इथे गोडी वाटत असल्यामुळे त्याला भान रहात नाही.

**प्रश्नकर्ता :** अजिबात आवडत नाही, तरीही आकर्षण होत असते त्याची खूप खंत वाटते.

**दादाश्री :** जर खंत वाटत असेल तर विषय निघून जातो. केवळ एक आत्माच पाहिजे. तर मग विषय कसा उभा होईल? दुसरे काही पाहिजे असेल, तर विषय उभा होईल ना? तुला विषयाचे पृथक्करण करता येते का?

**प्रश्नकर्ता :** आपण सांगा?

**दादाश्री :** पृथक्करण म्हणजे काय की, विषय हे डोळ्यांना आवडेल असे असते का? कानाने ऐकायला आवडते का? आणि जीभेने चाटले तर गोड लागते का? एकाही इन्द्रियाला आवडत नाही. या

नाकाला तर खरोखर आवडते ना? अरे, खूप सुंगध येतो ना? अत्तर लावलेले असते ना? म्हणजे असे पृथक्करण केल्यावर समजते. संपूर्ण नर्कच तिथे पडलेला आहे. परंतु असे पृथक्करण होत नसल्यामुळे लोक गोंधळतात. तिथेच मोह होतो, हे सुद्धा एक आश्चर्यच आहे ना!

'एक विषयाला जिंकून, जिंकला पूर्ण संसार,
राजाला जिंकून जिंकले, दळ पूर व अधिकार.'

**-श्रीमंद् राजचंद्र**

फक्त एका राजालाच जिंकले तर त्याचे सैन्य, राज्य आणि अधिकार सर्वच आपल्याला प्राप्त होते.(तसेच एका विषयाला जर जिंकले तर संपूर्ण जग जिंकले असे आहे!

**प्रश्नकर्ता :** आपल्याकडून ज्ञान प्राप्ती झाल्यानंतर आम्ही ह्याच जन्मातच विषय बीजापासून संपूर्ण निर्ग्रंथ होऊ शकतो का?

**दादाश्री :** सर्वच होऊ शकते. पुढील जन्मासाठी बीज पडणार नाही. ही जी जुनी बीजं आहेत ती तुम्ही धुऊन टाका, आणि नवीन बीज पडत नाही.

**प्रश्नकर्ता :** अर्थात पुढील जन्मी विषयासंबंधी एकही विचार येणार नाही?

**दादाश्री :** नाही येणार. थोडेफार कच्चे राहिले असेल तर पूर्वीचे थोडे विचार येतील पण ते विचार फारसे स्पर्शणार नाहीत. जिथे हिशोब नाही, त्याचे जोखिम नाही.

**प्रश्नकर्ता :** शीलवान कोणाला म्हणतात?

**दादाश्री :** विषयाचा विचार येत नाही, क्रोध-मान-माया-लोभ होत नाही, त्याला शीलवान म्हणतात.

कसोटीचे जर कधी प्रसंग आले, तर त्यासाठी दोन-तीन उपवास करा. जेव्हा (विषयाच्या) कर्माचा जोर खूप वाढतो तेव्हा उपवास केल्यावर ते बंद होते. उपवास केल्याने मरत नाही.

## [ 2 ] दृष्टी उपटली जाते 'थ्री विजनने'!

मी जो प्रयोग केला होता, तोच प्रयोग तुम्ही वापरायचा. आम्ही त्याच प्रयोगाचा निरंतर वापर करत असतो. आम्हाला तर ज्ञान होण्यापूर्वी सुद्धा जागृति रहात होती. कितीही सुंदर कपडे घातले असतील, दोन हजारांची साडी घातली असेल तरीही पाहताक्षणीच जागृती येत असे, त्यामुळे नेकेड (नग्न) दिसत असे. मग दुसरी जागृती उत्पन्न व्हायची, तेव्हा कातडी शिवायचे दिसते आणि तिसऱ्या जागृतीने पोट कापल्यावर आतील आतडे तसेच आतड्यांमध्ये काय काय बदल होत आहे हे सर्व दिसायचे. रक्तांच्या नसा आत दिसायच्या, संडास दिसायचे, अशाप्रकारे आतील सर्व घाण दिसायची. त्यामुळे मग विषय विकार उत्पन्न होणारच नाही ना! यात आत्मा शुद्ध वस्तु आहे, तिथे जाऊन आमची दृष्टी स्थिरावते. मग मोह कसा होईल?

श्रीमंद् राजचंद्रांनी सांगितले आहे की, 'देखत भूली टळे' म्हणजेच 'पाहिल्याबरोबर होणारी चूक' टळली तर सर्व दु:खांचा क्षय होतो. शास्त्रांत आपण वाचतो की स्त्रीवर राग (मोह) करु नका, परंतु स्त्रीला पाहिल्याबरोबरच हे विसरुन जातो, त्यास 'पाहताक्षणी होणारी चूक' असे म्हणतात.

'पाहताक्षणी होणारी चूक टळली' याचा अर्थ काय, तर ही मिथ्या दृष्टी आहे, ती दृष्टी परिवर्तित होऊन सम्यक् दृष्टी झाली तर सर्व दु:खांचा क्षय होतो. मग ती चूक पुन्हा घडू देणार नाही, दृष्टी खेचली जात नाही.

**प्रश्नकर्ता :** एखाद्या स्त्रीला पाहून पुरुषाला खराब भाव झाले, तर त्यात त्या स्त्रीचा दोष आहे का?

**दादाश्री :** नाही, त्यात त्या स्त्रीचा काही दोष नाही! भगवान महावीरांचे लावण्य पाहून पुष्कळ स्त्रियांना मोह उत्पन्न होत होता, पण त्यामुळे भगवंताला काही स्पर्शत नव्हते! अर्थात ज्ञान काय म्हणते की तुमची क्रिया सहेतु असली पाहिजे. तुम्ही अशी केशरचना नाही केली पाहिजे किंवा असे कपडे सुद्धा नाही घातले पाहिजेत की ज्यामुळे समोरच्या व्यक्तिला मोह उत्पन्न होईल. आपला भाव शुद्ध असेल तर

काहीही बिघडत नाही. भगवंत कशासाठी केशलोचन करत होते? या केसांमुळे एखादया स्त्रीचा माझ्यावर भाव बिघडला तर? म्हणून हे केसच काढून टाकले तर भाव बिघडणारच नाही. कारण भगवंत तर खूप रुपवान होते, महावीर भगवंतांचे रुप, तर संपूर्ण विश्वात अनुपम होते!

**प्रश्नकर्ता :** स्त्रीयां वरील मोह आणि राग जर निघून गेला, तर रुची संपत जाते का?

**दादाश्री :** रुचिची गाठ तर अनंत जन्मांपासून पडलेली आहे, ती केव्हा फुटेल हे सांगता येणार नाही. म्हणून या सत्संगातच पडून राहावे. या संगाबाहेर गेलो की, पुन्हा त्या रुचिच्या आधारे सर्व उगवेल. म्हणून या ब्रह्मचारींच्या संगातच रहावे लागते. अजुन ही रुची गेलेली नाही, म्हणून दुसऱ्या कुसंगात घुसल्या बरोबर लगेच चालू होऊन जाते. कारण की कुसंगाचा स्वभावच असा आहे. परंतु ज्याची रुची उडून गेली असेल तर मग त्याला कुसंग स्पर्शत नाही.

आमची आज्ञा पाळाल तर तुमचा मोह जाईल. तुम्ही स्वतः जर मोहाला काढायला जाल तर तो तुम्हालाच काढून टाकेल असा आहे! म्हणून मोह काढून टाकण्यापेक्षा त्यास सांगावे, 'बसा साहेब, आम्ही तुमची पुजा करतो!' मग वेगळे होऊन आपण त्यावर उपयोग केंद्रित केला आणि दादांच्या आज्ञेत राहिलो तर मोहाला लगेच स्वतःहून तिथून पळ काढावाच लागेल.

## [ 3 ] दृढ निश्चय, पोहचवतो पार

निश्चय कशास म्हणतात? की वाटेल तसे(विषय विकारांचे) सैन्य आपल्यावर चढाई करायला आले तरी आपण त्यांना वश होणार नाही! आत वाटेल तसे समजावणारे भेटले तरीही आपण त्यांचे ऐकायचे नाही! एकदा निश्चय केल्यावर, मागे वळून पाहत नाही, त्याला खाऱ्या अर्थाने निश्चय म्हणतात.

निश्चय म्हणजे सर्व विचारांना बंद करुन एकाच विचारावर ठाम रहाणे, की आपल्याला इथून स्टेशनला पोहोचायचे आहे, स्टेशनवरुन

गाडीतच बसायचे आहे. आपल्याला बसमधून जायचे नाहीच. असा जर तुमचा निश्चय पक्का असेल तर मग गाडीचे सर्व संयोग जूळन येतात. निश्चय कच्चा असेल तर गाडीचे संयोग मिळत नाहीत.

**प्रश्नकर्ता :** निश्चयापुढे टाइमींग बदलून जातो का?

**दादाश्री :** निश्चयापुढे सर्व टाइमींग बदलून जातात. हे भाऊ सांगत होते की 'शक्यतो मी तेथे पोहोचेल, पण जर नाही येऊ शकलो तर तुम्ही निघून जा.' तेव्हा आम्ही समजून गेलो की यांचा निश्चय कच्चा आहे. म्हणून मग तिथे एविडन्स (संयोग) असे जमतात की ज्यामुळे आपल्या धारणेनुसार होत नाही.

**प्रश्नकर्ता :** आपल्या निश्चयाला तोडतो कोण?

**दादाश्री :** आपलाच अहंकार. मोहवाला अहंकार आहे ना! मूर्छित अहंकार!

**प्रश्नकर्ता :** दानत चोर (खोटी) असणे ही निश्चयाची कमतरता म्हटली जाईल ना?

**दादाश्री :** कमतरता नाही, याला तर निश्चय म्हणता येणार नाही. कमतरता असली तर निघून जाते सर्व, पण तो तर निश्चयच नाही.

**प्रश्नकर्ता :** दानत चोर नसेल तर विचार येणे पूर्णपणे बंद होऊन जातात का?

**दादाश्री :** नाही, विचारांना येऊ द्या. विचार आले तर त्यात आपल्याला काय हरकत आहे? विचार येणे बंद होत नाहीत. फक्त आपली दानत मात्र खोटी नसावी. आत कोणत्याही प्रकारची लालच असली तरी तिच्या कचाट्यात सापडत नाही. असे स्ट्रोंग! विचार येतीलच कसे? विहीरीत पडायचेच नाही असा ज्याचा निश्चय असेल, तो जरी चार दिवसांपासून झोपला नसेल आणि त्याला विहीरीच्या कडेवर बसवले तरी तो तिथे झोपणार नाही.

तुमचा संपूर्ण ब्रह्मचर्य पाळण्याचा निश्चय आणि आमची आज्ञा,

हे दोन्ही जर एकत्र आले तर जबरदस्त कार्य सिद्धी होणारच, पण जर आतला निश्चय जरा सुद्धा डगमगला नाही, तर! आमची आज्ञा तर तो जिथे जाईल तिथे त्याला मार्ग दाखवेल. परंतु आपण किंचितही प्रतिज्ञा तोडू नये. जर विषयाचा विचार आला तर अर्ध्या तासापर्यंत प्रतिक्रमण करुन धूत रहायचे. की अजूनही हे विचार का येत आहेत! आणि नजर तर कुणाशीही मिळवायचीच नाही. ज्यांना ब्रह्मचर्यच पाळायचे आहे त्यांनी तर नजरेला नजर मिळवूच नये.

एखाद्या स्त्री जातीला जर सहजही आपल्या हाताने स्पर्श झाला असेल तर निश्चय डगमगतो. रात्री झोपूच देणार नाही असे हे परमाणू आहेत! म्हणून स्पर्श तर व्हायलाच नको. आणि जर दृष्टी सांभाळली गेली तर निश्चय डगमगत नाही!

**प्रश्नकर्ता :** एखाद्याचा निश्चय ब्रह्मचर्यासाठी डगमगत असेल तर त्याची पूर्वीची भावना तशी असेल, म्हणून?

**दादाश्री :** नाही, असे नाही, हा तर निश्चयच नाही. हा पूर्वीचा प्रोजेक्ट नाही आणि हा जो निश्चय केला आहे, तो तर लोकांचे पाहून केलेला आहे. हे फक्त लोकांचे पाहून अनुकरण केले आहे म्हणून डगमगतो. त्यापेक्षा लग्न करुन घे ना भाऊ, (लग्न केल्याने) काय नुकसान होणार आहे? एखादीचे लग्न तरी पार पडेल.

ब्रह्मचर्यात अपवाद ठेवू शकू, अशी वस्तु नाही. कारण की माणसाचे मन पोल (बहाणे) शोधत असते, एखादया ठिकाणी एवढे छोटेसे जरी छिद्र असेल तर मन त्यास मोठे करुन देते!

**प्रश्नकर्ता :** हा जो पोल शोधून काढतो, त्यात कोणती वृत्ति काम करते?

**दादाश्री :** यात मनच काम करते, वृत्ति नाही. मनाचा स्वभावच असा पोल शोधण्याचा आहे.

**प्रश्नकर्ता :** मन पोल शोधत असेल तर त्याला कशा प्रकारे थांबवायचे?

**दादाश्री :** निश्चयाने. निश्चय असेल तर बहाणे कसे बनवेल? स्वत:चाच निश्चय असेल तर तो बहाणा बनवणारच नाही ना? 'मांसाहार करायचा नाही' असा ज्याचा निश्चय आहे, तो कधी मांसाहार करतच नाही.

**प्रश्नकर्ता :** अर्थात प्रत्येक गोष्टीत निश्चय करायचा?

**दादाश्री :** निश्चयानेच सर्व कार्य होते.

**प्रश्नकर्ता :** आत्मा प्राप्त केल्यानंतर निश्चयबळ ठेवावे लागते?

**दादाश्री :** स्वत: ठेवायचेच नाही ना! आपण तर 'चंद्रेशला' सांगायचे की तुम्ही बरोबर निश्चय करा. ह्या बाबतीत प्रश्न विचारायचे असतील तर तो बहाणे शोधतो. म्हणून असे प्रश्न विचारायचे असेल तेव्हा त्याला म्हणायचे 'चूप' 'गेट आऊट' म्हटले की तो गप्प बसेल. 'गेट आऊट' म्हटल्या बरोबरच सर्व पळतात.

तुझ्या बाबतीत काय घडते?

**प्रश्नकर्ता :** दिवसभरात असा एविडन्स(संयोग) समोर आला तर, विषयाची एखादी गाठ फुटते, पण लगेच थ्री विझनने पाहतो.

**दादाश्री :** नदीत जर एकदाच बुडला तर मरुन जाणार ना? की रोज रोज बुडल्यावर मरणार? नदीत तर त्याचवेळी बुडून मरतो, मग काही हरकत आहे? नदीचे काही नुकसान होणार आहे का?

शास्त्रकारांनी तर एकाच वेळेच्या अब्रह्मचर्याला 'मृत्यू' म्हटले आहे.

मरुन जा, पण अब्रह्मचर्य होऊ देऊ नकोस.

कर्माचा उदय आला असेल आणि जर जागृती राहत नसेल तेव्हा ज्ञानाची वाक्ये मोठ्याने बोलून जागृती आणतो आणि कर्माच्या विरोधात बसतो, याला 'पराक्रम' म्हणतात. स्व-वीर्याला स्फुरायमान करणे म्हणजे पराक्रम होय. पराक्रमापुढे कोणाचीही हिम्मत नाही.

तू जितका सिन्सियर(निष्ठावान) तेवढी तुझी जागृति. आम्ही तुला हे सूत्ररुपाने देतो आणि लहान मुलगाही समजू शकेल असे स्पष्टपणे

समजावून देतो. जो जितका सिन्सियर, तितकी त्याची जागृति. हे तर सायन्स आहे. यात जेवढी सिन्सियारिटी असेल तेवढीच त्याची प्रगती होते, आणि ही सिन्सियारिटी तर थेट मोक्षापर्यंत घेऊन जाते. सिन्सियारिटीचे फळ मोरालिटीत(नैतिकतेत) येते.

**प्रश्नकर्ता :** त्या दिवशी आपण काही सांगत होता की तारुण्यातही 'रीज पॉइन्ट' असते, तर हे 'रीज पॉइन्ट' म्हणजे काय?

**दादाश्री :** 'रीज पॉइन्ट' अर्थात हे जे छप्पर असते ना, यात 'रीज पॉइन्ट' कोणत्या ठिकाणी येतो? टोकावर.

तारुण्य जेव्हा 'रीज पॉइन्ट' वर(टोकावर) जाते त्यावेळीच सर्व उध्वस्त करुन टाकते. त्यामधून जर तो 'पास' झाला, त्यात अडकला नाही, तर तो जिंकला. आम्ही तर सर्वकाही सांभाळून घेतो, पण त्याचे स्वत:चेच मन जर बदलत असेल तर त्यावर काही उपाय नाही. म्हणूनच आम्ही आत्ताच, उदयात येण्या अगोदरच त्याला शिकवतो की भाऊ, खाली बघून चल. स्त्रीला बघु नकोस. भजी-जिलेबीकडे सगळीकडे बघु शकतोस. परंतु या बाबतीत तुमची गॅरंटी देऊ शकत नाही, कारण की आता तारुण्य आहे.

## [ 4 ] विषय विचार हैराण करतात तेव्हा....

कधीतरी मनात काही खराब विचार आला आणि त्याला काढून टाकण्यात जर थोडा वेळ लागला तर त्याचे मोठे प्रतिक्रमण करावे लागते. इथे तर विचार येताक्षणी, ताबडतोब काढून टाकायचे, उपटून फेकून द्यायचे.

## [ 5 ] चालू नये, मनाच्या सांगण्याप्रमाणे!

मनाच्या सांगण्यानुसार चालूच नये. मनाचे सांगणे जर आपल्या ज्ञानाला अनुसरुन असेल, तर तितके एडजस्ट करुन घ्यावे. आपल्या ज्ञानाच्या विरुद्ध चालत असेल तर बंद करुन द्यावे. पहा ना, चारशे वर्षांपूर्वी कबीर म्हणाले होते, किती समंजस व्यक्ति होते ते! म्हणतात की, 'मनका चलता तन चले, ताका सर्वस्व जाय.' (मनाच्या सांगण्यानुसार

जो चालतो, त्याचे सर्वस्व जाते) समंजस नव्हते का कबीरजी? आणि हा तर मनाच्या सांगण्यानुसार चालत राहतो. मनाने सांगितले की, 'याच्याशी लग्न कर.' म्ह णून काय खरच लग्न करायचे?

**प्रश्नकर्ता :** नाही. असे करु नये.

**दादाश्री :** मन तर अजुन बोलेल. असे बोलेल तेव्हा तुम्ही काय कराल? ब्रह्मचर्य व्रत पाळायचे असेल तर स्ट्रोंग राहावे लागेल. मन तर असेही बोलेल आणि तुम्हालाही तसे बोलण्यास भाग पाडेल. म्हणूनच मी सांगत होतो ना की उद्या सकाळी तुम्ही इथून पळून सुद्धा जाल. याचे कारण? मनाच्या सांगण्याप्रमाणेच चालण्याऱ्यांचा काय भरोसा?

**प्रश्नकर्ता :** आता आम्ही इथून कुठेच पळून जाणार नाही.

**दादाश्री :** अरे, पण मनाच्या सांगण्यानुसार चालणारा माणूस इथून जाणार नाही, याची काय गॅरेंटी?? अरे, जर मी तुला दोन दिवस हलवले(रागावले) ना, अरे, थोडेसे जरी हलवले ना, तर परवाच तू इथून निघून जाशील! हे तर तुला माहितच नाही. तुमच्या मनाचा काय ठिकाणा?

सध्या तर तुमचे मन तुम्हाला 'लग्न करण्यासारखे नाही, लग्न करण्यात खूप दु:ख आहे' असे सांगून तुम्हाला मदत करत आहे. हा सिद्धांत प्रथमत: तुम्हाला तुमच्या मनानेच दाखविलेला आहे. हा सिद्धांत तुम्ही ज्ञानपूर्वक नक्की केलेला नाही, हा तर तुमच्या मनाने नक्की केलेला आहे. 'मनाने' तुम्हाला सिद्धांत दाखविला की 'असे करा.'

**प्रश्नकर्ता :** ज्ञानपूर्वक निश्चय केला असेल तर, मन त्याचा विरोध करणारच नाही ना?

**दादाश्री :** नाही. नाही करणार. ज्ञानपूर्वक निश्चय केला असेल तर त्याचा फाऊंडेशन(पाया) वेगळ्याच प्रकारचा असेल ना! त्याचे सर्व फाऊंडेशन आर.सी.सी. चे असतात. आणि हे तर रोडांचे, आत कोंक्रीट केलेले. म्हणून मग भेगा पडणारच ना?

## [ 6 ] 'स्वतः' स्वतःला रागवावे!

ह्या भावाला पाहा ना, स्वतःने स्वतःला चांगलेच खडसावले होते, खूप धमकावले होते, तो रडतही होता आणि स्वतःला धमकावतही होता. दोन्ही गोष्टी बघण्यासारख्या होत्या.

**प्रश्नकर्ता :** एके दिवशी दोन-तीन वेळा चंद्रेशला धमकावले होते, तेव्हा तो खूप रडलाही होता. आणि मला असेही सांगत होता की, यापुढे असे होणार नाही, तरी सुद्धा पुन्हा तसे होतच राहते.

**दादाश्री :** हो. तसे तर होतच राहणार. पण प्रत्येक वेळी त्याला सांगत राहायचे, आपण सांगत राहायचे आणि ते होत राहिल. सांगितल्यामुळे आपले वेगळेपण राहते. त्यात तन्मयाकार होत नाही. शेजारच्या (फाईल नं १) ला रागावतो अशा प्रकारे चालत राहते. असे करत करत पूर्ण होईल. सर्व फाईली पूर्ण होतील! विषयाचा विचार आला तरीही म्हणावे, की 'हे मी नाही, हे वेगळे आहे,' असे वेगळे होऊन त्याला रागवावे लागते.

**प्रश्नकर्ता :** तुम्ही जो आरश्यासमोर सामायिक करण्याचा प्रयोग दाखवता ना, मग प्रकृतिसोबत बातचीत (संवाद) करायचा, हे प्रयोग खूप चांगले वाटतात परंतु ते दोन-तीन दिवस चांगले चालते पण त्यानंतर प्रयत्न मंद पडतात.

**दादाश्री :** मंद पडले तर पुन्हा नव्याने चालू करायचे. जुने झाले म्हणजे मंद पडतातच. पुद्गालाचा स्वभावच असा आहे की जुने झाले म्हणजे ते बिघडू लागते. म्हणून पुन्हा नव्याने त्याची सुरुवात करावी.

**प्रश्नकर्ता :** अर्थात ह्या प्रयोगाद्वारेच कार्य सिद्ध व्हायला हवे. परंतु तसे होत नाही आणि अर्ध्यातूनच प्रयोग बंद होतो.

**दादाश्री :** असे करता करताच सिद्ध होते, पटकन होत नाही.

## [ 7 ] पश्चातापासहित प्रतिक्रमण!

**प्रश्नकर्ता :** कधी-कधी तर प्रतिक्रमण करण्याचा कंटाळा येतो. एकावेळी खूप सारे करावे लागतात.

**दादाश्री :** हो, हा अप्रतिक्रमणाचा दोष आहे, त्यावेळेस प्रतिक्रमण केले नव्हते, म्हणून आज हे घडले. आता प्रतिक्रमण केल्याने पुन्हा दोष होणार नाही.

**प्रश्नकर्ता :** कपडे (दोष) धुतले गेले असे केव्हा म्हणता येईल?

**दादाश्री :** प्रतिक्रमण करतो तेव्हा! आपल्या स्वत:च्याच लक्षात येते की मी धुऊन टाकले.

**प्रश्नकर्ता :** आत खंत वाटली पाहिजे?

**दादाश्री :** खंत तर वाटलीच पाहिजे ना? जोपर्यंत ह्या गोष्टींचा अंत येत नाही तोपर्यंत खंत तर वाटलीच पाहिजे. आपल्याला फक्त पहात रहायचे आहे की त्याला खंत वाटते की नाही. आपण आपले काम करायचे, तो त्याचे काम करेल.

**प्रश्नकर्ता :** हे सर्व खूप चिकट आहे. यात थोडा-थोडा फरक पडत राहिला आहे.

**दादाश्री :** जसा दोष भरला असेल तसा निघेल. पण ते पाच वर्षांनी किंवा दहा वर्षांनी किंवा बारा वर्षांनी सर्व खाली होऊन जाईल. टाकी वगैरे सर्व स्वच्छ करुन टाकेल. मग स्वच्छ! मग मजा करा!

**प्रश्नकर्ता :** एकदा बीज पडले म्हणजे ते रुपकमध्ये तर येणारच ना?

**दादाश्री :** बीज तर पडतेच ना! ते मग रुपकमध्ये तर येईल परंतु जोपर्यंत ते घट्ट होत नाही, तोपर्यंत कमी-जास्त होऊ शकते. म्हणून मरण्या अगोदर ते स्वच्छ होऊ शकते.

म्हणूनच आम्ही विषयाच्या दोष असलेल्यांना सांगत असतो ना की विषयाचे दोष झाले असतील, अन्य दोष झाले असतील, तर तू रविवारी उपवास कर आणि पूर्ण दिवस त्या दोषांचा पुन्हा पुन्हा विचार करुन त्यांना धुत राहा. असे जर आज्ञापूर्वक केले ना, तर कमी होतात!

**प्रश्नकर्ता :** विषय-विकारसंबंधी दोषांचे सामायिक-प्रतिक्रमण कशा प्रकारे करावे?

**दादाश्री :** आत्तापर्यंत ज्या चुका झाल्या असतील त्यांचे प्रतिक्रमण करायचे, आणि भविष्यात पुन्हा अशा चुका होणार नाहीत असा निश्चय करायचा.

**प्रश्नकर्ता :** आपल्याला सामायिकमध्ये पूर्वीचे जे काही दोष झाले असतील, तेच पुन्हा-पुन्हा दिसत असतील तर?

**दादाश्री :** दोष दिसतात तोपर्यंत त्यांची क्षमा मागायची. क्षमापना करायची, त्याच्यासाठी पश्चाताप करायचा, प्रतिक्रमण करायचे.

**प्रश्नकर्ता :** आता सामायिकमध्ये बसलो, तेव्हा जे दिसले तेच सारखे सारखे का येते?

**दादाश्री :** ते तर येईल, आत परमाणू असतील तर येतील. त्यात आपल्याला काय अडचण आहे?

**प्रश्नकर्ता :** हे येतात म्हणून असे वाटते की हे धुतले गेले नाही.

**दादाश्री :** नाही, हा माल तर अजून खूप वेळेपर्यंत राहील. अजून दहा-दहा वर्षांपर्यंत राहील, पण तुम्हाला ते सर्व काढून टाकायचे आहे.

**प्रश्नकर्ता :** हे जे दोन पाने उगवताच(अंकुर फुटताच) उपटून फेकून देण्याचे विज्ञान आहे, की विषयाची गाठ फुटते तेव्हा दोन पाने उगवताच उपटून फेकावे. तर जिंकून जाऊ ना?

**दादाश्री :** हो, पण विषय अशी वस्तु आहे की, जर याच्यात एकाग्रता झाली तर आत्म्याला विसरतो. अर्थात ही गाठ नुकसानकारक आहे. ते यासाठीच की ही गाठ फुटते तेव्हा एकाग्रता होऊनच जाते. एकाग्रता झाली तर त्यास विषय म्हटले जाते. एकाग्रता झाल्याशिवाय विषय म्हटलाच जाणार नाही ना! ही गाठ फुटते तेव्हा इतकी सारी जागृती राहिली पाहिजे की, विचार येताच तो त्याला उपटून फेकून देईल. तेव्हा मग त्याला तिथे एकाग्रता होणार नाही. जर एकाग्रता नसेल तर ते विषयच नाही, मग ती गाठ म्हटली जाते. अणि ही गाठ जेव्हा विरघळेल तेव्हा काम होईल.

**प्रश्नकर्ता :** ही गाठ विरघळली(संपली) मग तर आकर्षणाच व्यवहारच उरणार नाही ना?

**दादाश्री :** तो व्यवहारच बंद होऊन जातो. टाचणी आणि लोहचुंबकाचा संबंधच बंद होऊन जातो. तो संबंधच राहत नाही. या गाठीमुळेच हा व्यवहार चालू आहे ना! विषयाचा व्यक्ति स्वभाव आहे आणि आत्म्याचा सूक्ष्म स्वभाव आहे. अशी जागृति राहणे खूप कठीण आहे, त्यामुळे यात एकाग्रता झाल्याशिवाय राहतच नाही ना! हे तर ज्ञानी पुरुषांचे काम आहे, दुसऱ्या कुणाचे कामच नाही!

विषयाची गाठ मोठी असते, तिला निर्मुलन करण्याची खूपच गरज आहे, म्हणून नैसर्गिक रित्याच आपल्या इथे हे सामायिक चालू झाले आहे! सामायिक करा, सामायिकने सर्व निर्मूळ होते! काहीतरी तर करावे लागेल ना! दादाजी आहेत तोपर्यंत सर्व रोग काढावा लागेल ना? एखादी गाठच मोठी असते, पण जो रोग आहे तो तर काढावाच लागेल ना? ह्या रोगामुळेच अनंत जन्म भटकले आहात ना? ही सामायिक तर कशासाठी आहे की, विषयभावाचे बीज अजूनपर्यंत गेलेले नाही आणि या बिजातूनच नवीन चार्ज होते, या विषयभावाचे बीज निर्मूळ करण्यासाठीच ही सामायिक आहे.

## [ 8 ] स्पर्श सुखाची भ्रामक मान्यता

विषयाच्या घाणीत लोक पडले आहेत. विषयाच्या वेळी उजेड केला तर स्वत:ला ही आवडत नाही. उजेड झाला तर घाबरतात. म्हणूनच अंधार ठेवतात. उजेड असेल तर भोगण्याची जागा बघायला आवडत नाही. म्हणूनच कृपाळुदेवांनी भोगण्याच्या स्थानाला काय म्हटले आहे?

**प्रश्नकर्ता :** 'वमन करण्यायोग्य सुद्धा ही वस्तु नाही.' तरीही स्त्रीच्या अंगाकडे आकर्षित होण्याचे कारण काय असेल?

**दादाश्री :** आपली मान्यता. रोंग बिलीफ (चुकीची मान्यता) आहे म्हणून. गायीच्या अंगाला बघून आकर्षण का होत नाही?! केवळ मान्यताच आहे, बाकी काहीही नाही. मान्यता मोडून टाकली तर काहीच नाही.

**प्रश्नकर्ता :** ही मान्यता उभी होते, ती संयोग जुळून आल्यामुळे होते का?

**दादाश्री :** लोकांनी सांगितल्यामुळे आपली मान्यता तयार होते आणि आत्म्याच्या हजेरीत मान्यता झाल्यामुळे ती दृढ होते. नाहीतर यात असे आहे तरी काय? नुसते मांसाचे गोळे आहेत!

मनात विचार येतात, ते विचार आपोआपच येत राहतात, त्यांना आपण प्रतिक्रमण करुन धुऊन टाकावे. नंतर वाणीत असे बोलू नये की, विषय भोगणे हे खूप चांगले आहे तसेच वर्तनातही असे ठेवू नये. स्त्रियांसोबत दृष्टी मिळवू नये. स्त्रियांना पाहू नये. स्पर्शू नये. स्त्रियांना स्पर्श जरी झाला असेल तरी मनात प्रतिक्रमण झाले पाहिजेत, कि 'अरेरे, हिचा स्पर्श का झाला?! कारण की स्पर्शामुळे विषयाचा असर होत असतो.

**प्रश्नकर्ता :** याला तिरस्कार केले असे नाही का म्हटले जाणार?

दादाश्री : याला तिरस्कार म्हटले जात नाही. प्रतिक्रमण करताना आपण त्याच्या आत्म्याला सांगत असतो की 'आमची चूक झाली, पुन्हा अशी चूक होणार नाही अशी शक्ति द्या.' तिच्याच आत्म्याला असे म्हणायचे की मला, शक्ति द्या. जिथे आपली चूक झाली असेल, तिथेच शक्ति मागावी म्हणून मग शक्ति मिळत राहते.

**प्रश्नकर्ता :** स्पर्शाचा परिणाम होतो ना?

**दादाश्री :** त्यावेळी आपण मन संकुचित करुन घ्यावे. मी ह्या देहापासून वेगळा आहे, मी 'चंद्रेश'च नाही, असा उपयोग राहायला हवा, शुद्ध उपयोग राहिला पाहिजे. कधीतरी असे घडले तर तेव्हा शुद्ध उपयोगातच राहावे, की 'मी चंद्रेश'च नाही. स्पर्श सुख घेण्याचा विचार आला तर त्यास येण्यापुर्वीच उपटून फेकून द्यावे. जर लगेच उपटून फेकले नाही तर पहिल्या सेकंदात झाड बनून जाते, दुसऱ्या सेकंदात ते आपल्याला कचाट्यात घेते आणि तिसऱ्या सेकंदानंतर फाशीवर चढण्याची वेळ येते.

हिशोब नसेल तर स्पर्शही होत नाही. स्त्री-पुरुष एका खोलीत असतील तरी विचार सुद्धा येत नाहीत.

**प्रश्नकर्ता :** आपण सांगितले की हिशोब आहे, म्हणून आकर्षण होते. तर तो हिशोब आधीच कसा उपटून फेकू शकतो?

**दादाश्री :** हे तर त्याच क्षणी, ऑन दी मोमेन्ट केले तरच होणार. अगोदर नाही होत. मनात विचार आला की, 'स्त्रीसाठी माझ्या शेजारी जागा ठेवू.' त्यावेळी लगेचच त्या विचाराला उपटून टाकावे, 'हेतू काय आहे' ते पाहून घ्यावे. आपल्या सिद्धांताला पकडून आहे की सिद्धांताच्या विरुद्ध आहे. सिद्धांताच्या विरुद्ध असेल तर लगेचच उपटून फेकून द्यावे.

**प्रश्नकर्ता :** मला तर स्पर्श करायचाच नाही. पण एखादया मुलीने जर समोरुन स्पर्श केला तर मग मी काय करु?

**दादाश्री :** बरोबर. सापाने जर मुद्दाम स्पर्श केला तर त्यास आपण काय करु शकतो? पुरुष किंवा स्त्रीला स्पर्श करणे आवडेलच कसे? जिथे नुसता दुर्गंधच आहे, तिथे स्पर्श करणे कसे आवडेल?

**प्रश्नकर्ता :** पण स्पर्श करतेवेळी यातील काहीच आठवत नाही.

**दादाश्री :** हो, पण कसे आठवले? स्पर्श करतेवेळी तर इतके पॉइजन्स(विषारी)असते की मन-बुद्धि-चित्त-अहंकार या सर्वांवर आवरण येऊन जाते. मनुष्य बेभान होऊन जातो, अगदी जनावरा सारखाच होतो तेव्हा!

स्पर्श झाला किंवा असे काही झाले तर मला येऊन सांगायचे, म्हणजे मी त्वरित शुद्ध करुन देईल.

स्त्री किंवा विषयात रममाणता केली, ध्यान केले, निदिध्यासन केले तर त्याच्याने विषयाची गाठ पडते. मग ती गाठ कशी सुटेल? तेव्हा म्हणे, विषयाच्या विरुद्ध विचार केल्याने ती गाठ सुटते.

दृष्टी बदलली(आकर्षित झाली) की मग रमणता सुरु होते. ही जी दृष्टी बदलते, त्याचे कारण मागील जन्मांचे कॉजेस आहेत पण म्हणून काही सर्वांनाच पाहिल्यावर दृष्टी बदलत नसते. अमुकच व्यक्तिंना पाहिल्यावर दृष्टी बदलते. जर कॉजेस असेल, त्याचा पूर्वीचा हिशोब

बांधलेला असेल आणि त्यात जर रमणता झाली तर समजावे की इथे फार मोठा हिशोब आहे म्हणून तिथे जास्त जागृति ठेवावी. त्याच्यावर प्रतिक्रमणाचे तीर सतत मारत रहावे. आलोचना-प्रतिक्रमण आणि प्रत्याख्यान जबरदस्त करावे लागते.

विषय ही अशी वस्तु आहे की, मन आणि चित्त ज्याप्रमाणे राहत असेल त्याप्रमाणे त्यांना राहू देत नाही आणि एकदा का यात पडलो की मग त्यातच आनंद मानून चित्त वारंवार तिथल्या तिथेच जात राहते आणि 'खूप छान आहे, खूप मजा आहे' असे मानून त्यात असंख्य बीज पडत राहतात.

**प्रश्नकर्ता :** पण ते पूर्वीचे तसे घेऊन आलेला असतो ना?

**दादाश्री :** त्याचे चित्त तिथल्या तिथेच जात असते, ते पूर्वीचे घेऊन आलेला नाही परंतु मग त्याचे चित्त सटकूनच जाते हातातून! स्वतःची इच्छा नसते तरीही सटकून जाते. म्हणूनच ही मुले जर ब्रह्मचर्याच्या भावनेत राहिली तर उत्तम, आणि मग जे आपोआप स्खलन होते, तर ते गलन आहे. स्खलन रात्री होते, दिवसा होते ते सर्व गलन म्हटले जाते. पण ह्या मुलांना एकदा जरी विषयाने स्पर्श केला असेल तर मग रात्रंदिवस त्याचीच स्वप्ने पडतात.

तुला असा अनुभव आहे का, की जेव्हा विषयात चित्त जाते तेव्हा ध्यान (स्थिरता) बरोबर राहत नाही?

**प्रश्नकर्ता :** चित्ताने जर सहजही विषयाच्या स्पंदनांना स्पर्श केला असेल तर कितीतरी काळापर्यंत स्वतःची स्थिरता राहू देत नाही.

**दादाश्री :** अर्थात माझा सांगण्याचा उद्देश काय आहे की, तुम्ही संपूर्ण जगात फिरा, पण जर जगातील कोणतीही वस्तु तुमच्या चित्ताचे हरण करु शकली नाही, तर तुम्ही स्वतंत्र आहात. गेली कित्येक वर्षांपासून मी माझ्या चित्ताला पाहत आहे की त्यास कोणतीही वस्तू हरण करु शकत नाही, म्हणून मग मी स्वतःला ओळखले की, मी संपूर्णपणे स्वतंत्र झालो आहे. मनात वाटेल तसे खराब विचार आले तरी हरकत नाही, पण चित्ताचे हरण तर नाहीच झाले पाहिजे.

चित्तवृत्ति जितकी भटकेल तितके आत्म्याला भटकावे लागते. जिथे चित्तवृत्ति जाईल, तिथे आपल्याला जावे लागेल. चित्तवृत्ति नकाशा काढत असते. पुढील जन्मासाठी येण्या-जाण्याच नकाशा तयार करते. त्या नकाशाप्रमाणे मग आपल्याला फिरावे लागते. कुठे-कुठे भटकत असेल चित्तवृत्ति?

**प्रश्नकर्ता :** चित्त जिथे-तिथे अडकत नाही, परंतु एखाद्या ठिकाणी जर ते अडकत असेल तर तो मागील जन्माचा हिशोब आहे का?

**दादाश्री :** हो, हिशोब असेल तरच अडकणार. पण आता आपल्याला काय करायचे आहे? पुरुषार्थ तर त्यास म्हणतात की, जिथे हिशोब असेल तिथे सुद्धा अडकू देणार नाही. चित्त गेले की लगेच(प्रतिक्रमण करुन) धुऊन टाकले, तोपर्यंत अब्रह्मचर्य धरले जात नाही. चित्त गेले आणि धुऊन नाही टाकले तर मात्र ते अब्रह्मचर्य धरले जाईल. जे चित्ताला डगमगवतात ते सर्वच विषय आहेत. ज्ञानाच्या बाहेर ज्या-ज्या वस्तुत चित्त जाते, ते सर्वच विषय आहेत.

**प्रश्नकर्ता :** आपण सांगितले की विचार काहीही आले तरी त्यास हरकत नाही, परंतु चित्त तिथे जाते त्यास हरकत आहे.

**दादाश्री :** हो चित्ताचीच झंझट आहे ना! चित्त भटकते हीच झंझट! विचार तर वाटेल ते असतील, त्यास हरकत नाही. परंतु हे ज्ञान मिळाल्यानंतर चित्त मागेपुढे व्हायला नको.

**प्रश्नकर्ता :** जर कधी झाले, तर त्याचे काय?

**दादाश्री :** आपल्याला तिथे 'पुन्हा असे होणार नाही' असा पुरुषार्थ करावा लागेल. पूर्वी जेवढे जात होते तितकेच आता सुद्धा जाते का?

**प्रश्नकर्ता :** नाही, तेवढे स्लीप होत नाही, तरी सुद्धा मी विचारतो.

**दादाश्री :** नाही, परंतु चित्त तर जायलाच नको. मनात वाटेल तितके खराब विचार येतील त्यास हरकत नाही, त्यांना बाजूला सारत राहायचे. त्यांच्यासोबत बोलचालीचा व्यवहार(संवाद) करा की अमकी व्यक्ति भेटली तर काय कराल? त्याच्यासाठी ट्रक, मोटार कुठून आणाल?

अथवा सत्संगाच्या गोष्टी केल्या की मग मन परत नवीन विचार करायला लागेल.

सर्वात जास्त चित्त कशात फसते? विषयात. आणि एकदा चित्त विषयात फसले की तेवढेच आत्मऐश्वर्य तुटले. ऐश्वर्य तुटले म्हणजे जनावर बनला. अर्थात विषय अशी वस्तु आहे की, यातूनच पाशवता आली आहे. मनुष्यातून जनावरपणा विषयामुळेच आला आहे. तरी सुद्धा आम्ही काय सांगतो की हा तर पूर्वीचा भरलेला माल आहे, तो तर निघणारच परंतु आता मात्र नव्याने माल भरु नका, हे उत्तम म्हटले जाईल.

## [ 9 ] फाईल समोर कठोरता!

**प्रश्नकर्ता :** ते जर मोहजाळ टाकतील तर त्यातून कसे वाचावे?

**दादाश्री :** आपण दृष्टीच मिळवू नये. आपण ओळखावे की, ही जाळ्यात फसवणारी आहे, म्हणून तिच्यासोबत दृष्टीच मिळवू नये.

जिथे आपल्याला वाटते की इथे फसण्यासारखे आहे अशा व्यक्तिला भेटूच नये.

कुणासोबतही नजरेला नजर मिळवून बोलू नये, नजर खाली ठेवूनच बोलावे. दृष्टीनेच सर्व बिगडते. अशा दृष्टीत विष असते आणि मग हे विष चढते. म्हणूनच दृष्टी मिळवली असेल, नजर आकर्षित झाली असेल तर लगेचच प्रतिक्रमण करुन घ्यावे, इथे तर निरंतर सावधगिरी बाळगली पाहिजे. ज्याला हे जीवन बिघडवू द्यायचे नसेल त्याने सावध राहावे.

मन ओढले जात असेल, अशी फाईल(व्यक्ति) जेव्हा समोर येते तेव्हा मन चंचलच होत राहते.

तुमचे मन जेव्हा चंचल होते तेव्हा आम्हाला खूप दुःख वाटते. ह्याचे मन चंचल झाले होते. म्हणून आमची दृष्टी त्याच्यावर कडक होते.

फाईल येते त्यावेळी आत तुफान माजवते. त्याचे विचार

आल्याबरोबरच मन वर खाली, वर खाली होत असते. आत तर नुसती घाणच भरलेली आहे, कचरा मालच आहे. आत आत्म्याचीच किंमत आहे!

फाईल गैरहजर असेल तरीही आठवत असेल तर त्यात खूप जोखिम आहे. फाईल गैरहजर असेल तेव्हा आठवण येत नाही पण ती जेव्हा समोर येते तेव्हा परिणाम होत असेल तर ते सेकंडरी जोखिम. आपल्यावर त्याचा परिणाम होऊच देऊ नये. स्वतंत्र होण्याची आवश्यकता आहे. त्यावेळी आपली लगामच(ताबा) तुटून जाते. मग लगाम राहतच नाही ना!

ज्याची फाईल (अशी व्यक्ति जिच्यासाठी विशेष आकर्षण, ओढ असेल) झालेलीच असेल, त्याच्यासाठी खूप जोखिम आहे. त्या व्यक्तिसोबत कठोर राहावे. समोर आली तर डोळे वटारावे, मोठे करावे, ज्यामुळे ती फाईल तुला घाबरेल. उलट फाईल झाल्यावर लोकं चप्पल मारतात, ज्यामुळे मग ती व्यक्ति पुन्हा कधी तोंडच दाखवत नाही.

**प्रश्नकर्ता :** फाईल असेल, आणि त्याच्यावर आपल्याला तिरस्कार उत्पन्न होत नसेल तर मुद्दाम तिरस्कार उत्पन्न करायचा का?

**दादाश्री :** हो. तिरस्कार का उत्पन्न होणार नाही? जो आपले इतके सारे अहित करत आहे, त्याच्यावर तिरस्कार उत्पन्न नाही होणार का? याचा अर्थ अजून तुम्हाला त्यात रस आहे! दानत खराब आहे तुमची!

**प्रश्नकर्ता :** खूप परिचय झाला असेल तर त्याच्यासोबत अपरिचय कसा करावा? तिरस्कार करुन करावा का?

**दादाश्री :** 'माझी नाही, माझी नाही' असे करुन, खूप प्रतिक्रमण करावे. नंतर जेव्हा समोर भेटली तेव्हा तिला ऐकवून द्यायचे की, काय तोंड घेऊन फिरतेस, जनावरा सारखी, युजलेस!' म्हणून मग ती पुन्हा कधी तोंड दाखवणार नाही.

**प्रश्नकर्ता :** समोरील व्यक्ति आपल्यासाठी फाईल नाही परंतु

आपणच त्याच्यासाठी फाईल झालो आहोत असे जर आपल्या लक्षात आले तर त्यासाठी आपण काय करावे?

**दादाश्री :** मग तर ते लवकरात उडवून द्यायचे. तिथे जास्त कडक व्हावे. म्हणजे मग ती कल्पना रंगवायचीच बंद करुन टाकेल. नाही तर काही तरी वेड्यासारखे बोलावे. तिला सांगावे 'माझ्या समोर आलीस तर चार थोबाडीत वाजवेल!' माझ्यासारखा चक्रम भेटणार नाही तुला. 'असे म्हटले की मग ती पुन्हा येणारच नाही. ही तर अशाच प्रकारे सुटका होईल.'

## [ 10 ] विषयविकारी वर्तन? तर डीसमीस

इथे कुणावर दृष्टी बिघडली तर ते चुकीचे म्हटले जाईल. इथे तर सर्वजण विश्वासाने येतात ना!

इतर ठिकाणी पाप केले असेल तर ते इथे आल्यावर धुतले जाते, परंतु इथे केलेल्या पापांना नर्कात भोगावे लागते. जे होऊन गेले असेल त्यांना लेट गो करा(जाऊ दया) परंतु नवीन तर होऊच द्यायचे नाही ना! आता जे होऊन गेले त्यावर काही उपाय आहे का?

पाशवीपणा करण्यापेक्षा लग्न केलेले बरे. लग्न करण्यात काय अडचण आहे? लग्नाचा पाशवीपणा तरी बरा, लग्न करायचे नाही आणि फालतू चाळे करायचे, याला तर भयंकर पाशवीपणा म्हटले जाते, ते तर नरकगतिचे अधिकारी! आणि ते तर इथे असायलाच नको ना? लग्न हा तर हक्काचा विषय म्हटला जातो.

ब्रह्मचर्य भंग करणे हा तर सर्वात मोठा दोष आहे. ब्रह्मचर्य भंग होते तेव्हा तर मोठे संकट, जिथे होतो तिथून खाली घसरलो. दहा वर्षांपूर्वी लावलेले झाड असेल आणि ते जर पडले तर ते आजच लावल्यासारखे झाले ना! आणि त्यामुळे मागील दहा वर्षे वाया गेली ना! अर्थात ब्रह्मचर्यवाला एकदा जरी अब्रह्मचर्यात पडला म्हणजे तो कामातून गेला.

**प्रश्नकर्ता :** निश्चय तर आहे पण चुका होतातच.

**दादाश्री :** दुसऱ्या ठिकाणी चुका झाल्या तर चालवून घेऊ. परंतु विषय संयोग व्हायला नको.

दोन कलमे(गोष्टी) लिहावी. असे लिहावे की, आमच्याकडून जर विषयविकारी वर्तन झाले तर आम्ही स्वतःच इथून निवृत्त होऊ, कोणालाही आम्हाला निवृत्त करावे लागणार नाही. आम्ही स्वतःच हे स्थान सोडून निघून जाऊ. आणि दूसरे म्हणजे दादाश्रींच्या हजेरीत प्रमाद झाला अर्थात दादाजींच्या उपस्थितीत झोपेची डुलकी आली तर त्यावेळी संघ जी शिक्षा करेल ती आम्हाला मान्य आहे. मग ती शिक्षा तीन दिवस उपाशी राहण्याची असो किंवा अशी कोणतीही शिक्षा असो, तरी त्याचा आम्ही स्वीकार करु.

## [ 11 ] सेफसाइड पर्यंतचे कुंपण....

ब्रह्मचर्य पालन करता यावे यासाठी इतकी कारणे तर असायला हवीत. त्यात पहिले म्हणजे आपले हे 'ज्ञान' असायला हवे. ब्रह्मचारींचा समुह हवा. ब्रह्मचारींसाठी असलेली राहण्याची जागा शहरापासून थोडी दूर असायला हवी आणि त्याचसोबत त्यांचे पोषण व्हायला हवे. असे सर्व 'कॉजेस' (कारणे) असायला हवेत.

**प्रश्नकर्ता :** याचा अर्थ असा झाला की 'कुसंग' 'निश्चयबळाला' तोडून टाकते?

**दादाश्री :** हो, निश्चयबळाला तोडून टाकते! अरे, माणसाचे संपूर्ण परिवर्तनच करुन टाकते. आणि सत्संग सुद्धा माणसाचे परिवर्तन करुन टाकतो. परंतु एकदा कुसंगामध्ये गेलेल्या व्यक्तिला पुन्हा सत्संगामध्ये आणायचे असेल तर खूप कठीण होते आणि सत्संगवाल्या व्यक्तिला जर कुसंगी बनवायचे असेल तर जरा सुद्धा वेळ लागत नाही.

**प्रश्नकर्ता :** सर्व गाठी आहेत, त्यात विषयविकाराची गाठ जरा जास्त त्रास देते.

**दादाश्री :** काही गाठी जास्त त्रास देतात. त्यासाठी आपल्याला सैन्य तयार ठेवावे लागते. या सर्व गाठी तर हळूहळू एक्झोस्ट (खाली)

होतच राहिल्या आहेत, घासल्या जातच आहेत; म्हणून एके दिवशी सर्व संपूनच जाणार आहेत ना?!

**दादाश्री :** सैन्य म्हणजे काय? प्रतिक्रमण?

**प्रश्नकर्ता :** प्रतिक्रमण, दृढ निश्चय, असे सर्व सैन्य ठेवावे लागते आणि 'ज्ञानी पुरुष' यांचे दर्शन, या दर्शनापासून दूर झालात तरी खूप कठीण होऊन बसेल. सेफसाइड(स्वसुरक्षा) ही काही सोपी गोष्ट नाही.

**प्रश्नकर्ता :** संपूर्ण सेफसाइड केव्हा होईल, त्याचा तर काही नेमच नाही ना! पण पस्तीस वर्षांनंतर त्याचे दिवस मावळत जातात, म्हणून मग ते तुम्हाला जास्त हैराण करत नाहीत. त्यानंतर मग तुमच्या धारणेनुसार चालत राहते. ते तुमच्या विचारांच्या आधीन राहतात. तुमची इच्छा बिघडत नाही. नंतर तुम्हाला कोणी काही नुकसान करत नाही. परंतु वयाच्या पस्तीस वर्षांपर्यंत तर खूपच मोठे जोखिम आहे!

## [ 12 ] तितिक्षाच्या तपाने तापवा मन-देह!

**प्रश्नकर्ता :** ज्या दिवशी उपवास केला असेल, त्या रात्री वेगळ्याच प्रकारचा आनंद वाटतो, याचे कारण काय असेल?

**दादाश्री :** बाहेरचे सुख घेतले नाही म्हणून आतील सुख उत्पन्न होतेच. बाहेरचे सुख घेतात म्हणून आतील सुख प्रकट होत नाही.

आम्ही उणोदरी तप शेवटपर्यंत चालू ठेवलेले! दोन्ही वेळा आवश्यकतेपेक्षा कमीच खायचे, नेहमीसाठी! कमीच खायचे त्यामुळे आत निरंतर जागृति राहते. उणोदरी तप म्हणजे काय की दररोज चार पोळ्या खात असाल तर दोनच पोळ्या खाणे, याला उणोदरी तप म्हणतात.

**प्रश्नकर्ता :** आहारामुळे ज्ञानात किती बाधा येते?

**दादाश्री :** खूप बाधा येते. आहार खूप बाधक आहे. कारण की हा जो आहार पोटात जातो, त्यापासून दारू तयार होते अणि त्यामुळे मग संपूर्ण दिवस दारूची धुंद, नशाच नशा चढत राहते.

ज्याला ब्रह्मचर्य पाळायचे आहे, त्याने ही दक्षता घेतली पाहिजे की, अमुक आहारने उत्तेजना वाढत जाते. म्हणून असा आहार कमी केला पाहिजे. चरबी वाढविणारा आहार जसे की, तूप-तेल(जास्त) नाही खायचे, दुधाचे प्रमाण सुद्धा कमी करावे, वरण-भात, भाजी-पोळी निवांतपणे खाऊ शकता परंतु त्याचेही प्रमाण कमी ठेवावे, ठासून खाऊ नये. अर्थात आहार इतकाच घेतला पाहिजे की ज्यामुळे त्याची नशा चढणार नाही, रात्री तीन-चार तासच झोप येईल इतकाच आहार घेतला पाहिजे.

इतक्या लहान लहान मुलांना तुपाच्या मिठाया आणि डिंकाचा पाक असे सर्व पदार्थ खाऊ घालतात, त्यामुळे नंतर त्यांच्यावर खूप वाईट परिणाम होतो. ते खूप विकारी होऊन जातात. अर्थात असे पदार्थ लहान मुलांना जास्त प्रमाणात देऊ नये. यांचे प्रमाणे मोजकेच ठेवावे.

मी तर चेतावणी देतो की जर ब्रह्मचर्य पाळायचे असेल तर कंदमूळ खाऊ नये.

**प्रश्नकर्ता :** कंदमूळ नाही खाल्ले पाहिजे का?

**दादाश्री :** कंदमूळ खाणे आणि ब्रह्मचर्य पाळणे ही रोंग फिलॉसॉफी(चुकीचे दर्शन) आहे, विरोधी गोष्ट आहे.

**प्रश्नकर्ता :** कंदमूळ खाऊ नये, हे जीव हिंसा होते म्हणून हिंसेमुळे की मग त्यामागे दूसरे काही कारण आहे.

**दादाश्री :** ही कंदमूळे तर अब्रह्मचर्याला जबरदस्त पुष्टी देणारी आहेत. म्हणून असे नियम ठेवावे लागतात की ज्यामुळे त्यांचे ब्रह्मचर्य टिकून राहिल.

## [ 13 ] नाही व्हावा असार, पुद्‌गलसार

ब्रह्मचर्य हे काय आहे? ते पुद्‌गलसार आहे. जे आपण खात असतो, पित असतो, या सर्वांचे सार काय? तर 'ब्रह्मचर्य'! तुमचे हे सार जर निघून गेले तर आत्म्याचा जो त्याला आधार आहे, तो आधार 'लूज' (कमजोर) होऊन जाईल! अर्थात् ब्रह्मचर्य मुख्य वस्तु आहे. एकीकडे ज्ञान असेल आणि दूसरीकडे ब्रह्मचर्य असेल, तर सुखाची

सीमाच राहणार नाही ना! मग तर असे परिवर्तन येते की विचारुच नका! कारण ब्रह्मचर्य हे तर पुद्गलसार आहे ना?

हे जे आपण सर्व खात असतो, पीत असतो, याचे पोटात काय होत असेल?

**प्रश्नकर्ता :** रक्त बनते.

**दादाश्री :** या रक्ताचे मग काय तयार होते?

**प्रश्नकर्ता :** रक्ताचे वीर्य तयार होते.

**दादाश्री :** असे का! वीर्याला समजतो का तू? रक्ताचे वीर्य बनते, मग त्या वीर्याचे काय तयार होते? रक्ताचे सात धातु आहेत असे सांगतात ना! यामधून एकापासून हाडं तयार होतात, एकातून मांस तयार होते, आणि सर्वात शेवटी वीर्य तयार होते. अंतिम अवस्था वीर्याची आहे. वीर्याला पुद्गलसार म्हटले जाते. दुधाचे सार म्हणजे तुप म्हटले जाते, त्याचप्रमाणे आहाराच्या साराला वीर्य म्हटले जाते.

लोकसार हे मोक्ष आहे आणि पुद्गलसार हे वीर्य आहे. जगातील सर्व पदार्थ अधोगामी आहेत. फक्त वीर्यच जर आपण ठरवले तर ऊर्ध्वगामी होऊ शकते. म्हणूनच वीर्य ऊर्ध्वगामी व्हावे अशी भावना केली पाहिजे.

**प्रश्नकर्ता :** ह्या ज्ञानात राहिलो तर आपोआप ऊर्ध्वगमन होईल ना?

**दादाश्री :** हो, आणि आपले हे ज्ञानच असे आहे की, जर ह्या ज्ञानात राहिले तर काही अडचण नाही, पण जेव्हा अज्ञान उभे राहते तेव्हा आत हा रोग तयार होतो. त्यावेळी जागृति ठेवावी लागते. विषयात तर अपार हिंसा आहे, खाण्यात-पिण्यात अशी हिंसा होत नसते.

या जगातील वैज्ञानिकांचे तसेच ह्या सर्व लोकांचे म्हणणे आहे की, वीर्य-रज हे अधोगामी आहेत. परंतु अज्ञानता आहे म्हणून अधोगामी आहेत. ज्ञानात तर ऊर्ध्वगामी होत असते. कारण ज्ञानाचा प्रताप आहे ना! ज्ञान असेल तर कोणतेही विकार उत्पन्न होतच नाहीत.

**प्रश्नकर्ता :** आत्मवीर्य प्रकट होते अर्थात यात काय होत असते?

**दादाश्री :** आत्म्याची शक्ति खूप वाढते.

**प्रश्नकर्ता :** तर मग हे जे दर्शन आहे. जागृति आहे, हे आणि आत्मवीर्य या दोघांचे काय कनेक्शन (संबंध) आहे?

**दादाश्री :** जागृति आत्मवीर्यात गणली जाते.

आत्मवीर्याचा अभाव असेल तर व्यवहाराचे सोल्युशन (निराकरण) न करता व्यवहाराला सरकवून बाजूला ठेवतो. जेव्हा की आत्मवीर्यवाला तर म्हणेल, वाटेल ते येऊ दे, तो विचलित होत नाही. आता ह्या सर्व शक्ति उत्पन्न होतील!

**प्रश्नकर्ता :** ह्या सर्व शक्ति ब्रह्मचर्यामुळे उत्पन्न होतात का?

**दादाश्री :** हो, ब्रह्मचर्य चांगल्या प्रकारे पाळले गेले असेल तेव्हाच आणि त्यात जरा सुद्धा लिकेज होऊ नये. हे तर काय झाले आहे की, व्यवहार शिकलेले नाही आणि असेच हे सर्व हातात आले आहे.

जिथे रुची असेल तिथे आत्म्याचे वीर्य वर्तत असते. ह्या लोकांची रुची कशात आहे? आईस्क्रीममध्ये तर आहे, परंतु आत्म्यात नाही.

हा संसार आवडत नाही, सर्वात सुंदर वस्तु असेल तरीही ती जरासुद्धा आवडत नाही. फक्त आत्म्याचेच आवडत असते, आवडच बदलून जाते. आणि जेव्हा देहवीर्य प्रकट होते तेव्हा आत्म्याचे आवडत नाही.

**प्रश्नकर्ता :** आत्मवीर्य प्रकट होणे हे कशाने शक्य होते?

**दादाश्री :** आमची आज्ञा पाळण्याचा निश्चय केला असेल, तेव्हापासून ऊर्ध्वगतीत जातो.

अधोगतीत जावे, अशी वीर्याला सवय नसते, स्वत:चा निश्चय नसल्यामुळे अधोगतीत जाणे होते. निश्चय केला की मग दुसऱ्या बाजूला वळते आणि मग त्याच्या चेहऱ्यावर सर्वांना तेज दिसू लागते. आणि जर ब्रह्मचर्य पाळत असताना जर चेहऱ्यावर असा काही परिणाम दिसून आला नाही, तर 'ब्रह्मचर्य पूर्णपणे पाळले नाही' असे म्हटले जाईल.

**प्रश्नकर्ता :** वीर्याचे ऊर्ध्वगमन होणे सुरु व्हायचे असेल तर त्याचे लक्षण काय?

**दादाश्री :** चेहऱ्यावर तेज येते, मनोबळ वाढत जाते, वाणी फर्स्ट क्लास निघते, वाणी गोडवा असतो. वर्तन गोड असते. ही सर्व त्याची लक्षणे असतात. त्यासाठी तर खूप वेळ लागतो, आताच्या आता हे सर्व शक्य होत नाही. लगेच होत नाही.

**प्रश्नकर्ता :** स्वप्नदोष का होत असेल?

**दादाश्री :** समजा वर पाण्याची टाकी असेल, आणि त्या टाकीतून पाणी खाली सांडायला लागले तर आपल्याला नाही का समजणार की, ती उतू गेली! स्वप्नदोष म्हणजे उतू जाणे. (सांडणे) टाकी उतू गेली! मग कॉक ठेवायला नको का?

आहारावर कंट्रोल केला तर स्वप्नदोष होत नाही. म्हणूनच हे महाराज एकदाच आहार घेतात ना तिथे! आणखी काहीच घेत नाहीत, चहा वैगरे काहीच घेत नाहीत.

**प्रश्नकर्ता :** यात रात्रीचे जेवण महत्वाचे आहे. रात्रीचे जेवण कमी केले पाहिजे.

**दादाश्री :** रात्री जेवायचेच नाही. हे महाराज एकदाच जेवतात.

तरीही डिस्चार्ज झाले तर मग त्यास हरकत नाही. असे तर भगवंतांनी म्हटले आहे की त्यास हरकत नाही. टाकी भरली म्हणजे झाकण उघडे होते. जोपर्यंत ब्रह्मचर्य ऊर्ध्वगमन झाले नाही तोपर्यंत अधोगमनच होते. ब्रह्मचर्याचा निश्चय केला तेव्हापासूनच ऊर्ध्वगमन होण्यास सुरुवात होते.

आपण सावधानीने चाललेले चांगले. महिन्यातून चार वेळा झाले तरी हरकत नाही. आपण मुद्दाम डिस्चार्ज करु नये. तो अपराध आहे. त्यास आत्महत्या म्हणतात. आपोआप झाले तर हरकत नाही. हे तर सर्व उलट-सुलट खाल्ल्याचे परिणाम आहेत. डिस्चार्जची असी सूट कोण देणार? ती लोकं सांगतात, डिस्चार्ज तर व्हायलाच नको. तेव्हा म्हणा, मग काय मी मरु? विहीरीत उडी मारु?

**प्रश्नकर्ता :** वीर्याचे गलन होते हे पुद्‌गलच्या स्वभावात असते की, कुठेतरी आपले लिकेज होत असते म्हणून असे होते?

**दादाश्री :** आपण पाहिले आणि आपली दृष्टी बिघडली म्हणून वीर्याचा अमुक भाग 'एक्झोस्ट' (स्खलित) झाला असे म्हटले जाते.

**प्रश्नकर्ता :** ते तर विचारांमुळे पण होत असते.

**दादाश्री :** विचारांमुळे सुद्धा 'एक्झोस्ट' होते, दृष्टीने पण एक्झोस्ट होते. तो 'एक्झोस्ट' झालेला माल मग डिस्चार्ज होत राहतो.

**प्रश्नकर्ता :** पण हे जे ब्रह्मचारी आहेत त्यांना तर असे काही संयोग नसतात, ते तर स्त्रियांपासून दूर राहतात. स्त्रियांचा फोटो ठेवत नाही, कॅलेन्डर ठेवत नाही, तरीसुद्धा त्यांचे डिस्चार्ज होत राहते. तर त्यांचे स्वाभाविक डिस्चार्ज नाही का म्हटले जाणार?

**दादाश्री :** तरी पण त्यांना मनात हे सर्व दिसत असते. दुसरे असे की, ते जर आहार जास्त घेत असतील आणि त्याचे वीर्य जास्त तयार होत असेल, त्यामुळे तो प्रवाह वाहून जाईल असेही होऊ शकते.

वीर्याचे स्खलन कुणाचे होत नाही? तर ज्याचे वीर्य खूप मजबूत झालेले असेल, खूप घट्ट झालेले असेल, त्याचे स्खलन होत नाही. हे तर सर्व पातळ झालेले वीर्य म्हणायचे.

**प्रश्नकर्ता :** मनोबळाने पण त्याला थांबवू शकतो ना?

**दादाश्री :** मनोबळ तर खूप काम करते! मनोबळच काम करते ना! पण ते ज्ञानपूर्वक असले पाहिजे. मनोबळ काही असेच राहत नाही ना!

**प्रश्नकर्ता :** स्वप्नात जो डिस्चार्ज होतो तो मागील तोटा आहे का?

**दादाश्री :** त्याचा काही प्रश्न नाही. हे मागील तोटे स्वप्नावस्थेत सर्व निघून जातील. स्वप्नावस्थेसाठी आपण अपराधी मानत नाही. आपण जागृत अवस्थेला अपराध मानतो, उघड्या डोळ्यांनी जागृत अवस्था!

पण तरी सुद्धा स्वप्न आले म्हणून त्याला अगदी दूर्लक्ष करण्याचीही गरज नाही, तिथे सावध राहावे. स्वप्नावस्थेनंतर सकाळी त्यासाठी पश्चाताप करावा लागतो, त्याचे प्रतिक्रमणही करावे लागते की पुन्हा असे होऊ नये. आपल्या पाच आज्ञेत राहिले तर त्यात विषय-विकार होईल असे आहेच नाही.

तुम्हाला ब्रह्मचर्याचे पालन करायचे असेल तर सर्व प्रकारे सावध राहावे लागेल. वीर्य जेव्हा ऊर्ध्वगामी होते तेव्हा मग आपोआप चालत राहील. अद्याप तर वीर्य ऊर्ध्वगामी झालेले नाही. अजून तर त्याचा अधोगामी स्वभाव आहे. वीर्य ऊर्ध्वगामी होते तेव्हा सर्वच उंची वर चढते. मग तर वाणी-बाणी छान निघते, आत दर्शनही उच्च प्रकारचे विकसित झालेले असते. वीर्य ऊर्ध्वगामी झाल्यानंतर अडचण येत नाही, तोपर्यंत खाण्या-पिण्याचे खूप नियम ठेवावे लागतात. वीर्य ऊर्ध्वगामी होण्यासाठी तुम्हाला त्याची मदत तर करावी लागेल ना, की मग असेच चालत राहील?

ब्रह्मचर्य जर असे कित्येक वर्षांपर्यंत कंट्रोलपूर्वक सांभाळता आले तर वीर्य ऊर्ध्वगामी होते आणि तेव्हा मग हे शास्त्र पुस्तके हे सर्व डोक्यात धारण करु शकतो. धारण करणे हे काही सोपे नाही, नाहीतर एकीकडे वाचतो आणि दुसरीकडे विसरत जातो.

**प्रश्नकर्ता :** हे जे प्राणायाम करतात, योग करतात हे ब्रह्मचर्यासाठी मदतरुप होऊ शकते का?

**दादाश्री :** जर ते ब्रह्मचर्येच्या भावनेने केले असेल तर मदतरुप होऊ शकते. ब्रह्मचर्यासाठी भावना असायला हवी. आणि तुम्ही जर तब्येत चांगली करण्यासाठी करत असाल तर त्याने तब्येत चांगली राहते. अर्थात भावनेवर सर्व काही आधारीत आहे. पण तुम्ही याच्यात्याच्यात पडू नका, नाहीतर तुमचा आत्मा राहून जाईल एकीकडे.

ब्रह्मचर्य व्रत घेतले असेल आणि त्यात काही उलट-सुलट घडले तर गोंधळून जातो. एक मुलगा अस्वस्थ दिसत होता, तेव्हा मी विचारले, 'काय भाऊ, का अस्वस्थ आहेस?' तेव्हा तो म्हणाला, तुम्हाला सांगताना

मला लाज वाटते. तेव्हा मी म्हणालो, 'काय लाज वाटते? बरं मग लिहून दे.' तोंडाने सांगायला लाज वाटते तर लिहून दे. तेव्हा तो म्हणाला की मला महिन्यातून दोन-तीन वेळा डिस्चार्ज होऊन जातो. त्यावर मी म्हणालो, 'अरे वेड्या, त्यात इतके कशाला घाबरतोस! तुझी दानत तर तशी नाही ना? तुझी दानत खोटी आहे का?' तेव्हा म्हणतो, 'अजिबात नाही, मुळीच नाही.' त्यावर मी म्हणालो, 'तुझी दानत शुद्ध असेल तर ते ब्रह्मचर्यच आहे. तेव्हा म्हणतो, पण असे होते का? मी म्हणालो, भाऊ, ते गलन नाही. ते तर पुरण झालेले गलन होते. त्यात तुझी दानत बिघडणार नाही असे ठेव. तेवढे सांभाळ. दानत बिघडायला नको की यात सुख आहे. आतल्या आत दुःखी होत होता बिचारा! असे सांगून टाकले तर लगेच शुद्ध करुन देतो.

समजा आता मनात विषयाचा विचार आला, आणि लगेच तन्मायाकार झाला म्हणून आतील भरलेला माल गळून खाली जातो (सूक्ष्मात स्खलन होतो) खाली गेला की मग सर्व जमा होऊन निघून जाते पटकन, परंतु जर विचार आल्याबरोबर लगेच त्याला उपटून फेकून दिले तर मग आत गळत नाही, ऊर्ध्वगामी होते. म्हणजे आत असे संपूर्ण विज्ञान आहे! संपूर्ण!

**प्रश्नकर्ता :** विचार येताक्षणी?

**दादाश्री :** ऑन दी मोमेन्ट(त्याच क्षणी). बाहेर निघत नाही परंतु आतल्या आतच वेगळा झाला. म्हणजे जो माल बाहेर निघण्यालायक झाला तो मग शरीरात टिकत नाही.

**प्रश्नकर्ता :** वेगळे झाल्यानंतर जर प्रतिक्रमण केले तर पुन्हा वर चढणार नाही, किंवा ऊर्ध्वगमन होणार नाही का?

**दादाश्री :** प्रतिक्रमण केले तर काय होते की तुम्ही असा अभिप्राय दाखवता की, आम्ही त्यापासून वेगळे आहोत, आम्हाला त्याच्याशी काही घेणे-देणे नाही.

भरलेला माल आहे तो तर निघाल्याशिवाय राहणार नाही. विचार आला आणि त्याला पोषण दिले, तर वीर्य कमजोर होते. म्हणून कुठल्याही

प्रकारे डिस्चार्ज होऊन जाते. आणि जर आत टिकले, म्हणजे विषयाचा विचारच आला नाही तर ऊर्ध्वगामी होते. वाणी वगैरे सर्वच मजबुत होऊन निघते. नाहीतरी विषयाला आम्ही संडास म्हटलेलेच आहे. हे जे उत्पन्न होते ते संडास होण्यासाठीच उत्पन्न होते. ब्रह्मचर्य पाळतो त्याला सर्व प्राप्त होते. स्वतःच्या वाणी, बुद्धी, समज या सर्वांमध्ये, प्रकट होते. अन्यथा बोललेल्या वाणीचा प्रभाव पडत नाही, वाणी परिणामकारक होतच नाही. वीर्याचे ऊर्ध्वगमन झाले की मग वाणी फर्स्टक्लास निघते आणि सर्व शक्ति उत्पन्न होतात. सर्व आवरणे तुटून जातात.

विषयाचा विचार केव्हा येतो? तर सहज कुठे पाहिले आणि आकर्षण झाले की विचार येतो. एखाद्या वेळी असे पण होते की आकर्षण झाल्याशिवाय विचार येतो. विषयाचा विचार आला म्हणजे मनात ताबडतोब मंथन सुरु होते आणि सहजही मंथन झाले की मग ते स्खलन होऊनच जाते, लगेचच, ऑन दी मोमेन्ट. म्हणून आपण रोपटे उगवण्या आधीच उपटून फेकून दिले पाहिजे. दूसरे सर्व चालते, पण हे विषयरुपी रोप खूपच दुःखदायी आहे, ज्या माणसाची संगत नुकसानकारक असेल त्याच्यापासून दूर राहिले पाहिजे. म्हणूनच शास्त्रकारांनी असे सर्व नियम ठेवलेले की ज्या जागेवर स्त्री बसली असेल त्या जागेवर बसू नये, जर ब्रह्मचर्य पाळायचे असेल तर, आणि संसारी राहायचे असेल तर तुम्ही बसू शकता.

**प्रश्नकर्ता :** खरे तर विचार येऊच नये ना?

**दादाश्री :** विचार तर आल्याशिवाय राहणार नाही. आत भरलेला माल आहे म्हणून विचार तर येईल, पण त्यावर प्रतिक्रमण हा उपाय आहे. विचार येऊच नये असे होईल तर तो अपराध आहे.

**प्रश्नकर्ता :** अर्थात (विषयाचा विचारच येणार नाही) तशी स्टेज यायला पाहिजे?

**दादाश्री :** हो पण विचार न येणे, अशी स्थिती तर दीर्घ काळापासून, डेवलप होत होत पुढे जातो, तेव्हा येते. प्रतिक्रमण करत करत पुढे जातो, तेव्हा मग त्याची पूर्णाहुती होते ना! प्रतिक्रमण करायला सुरुवात

केली म्हणजे मग पाच जन्मानंतर-दहा जन्मानंतर पूर्णाहुती होऊनच जाते ना! एका जन्मात तर कदाचित संपणारही नाही.

लोकांना हे माहितच नाही की हा विचार आला तर काय होईल? ते तर म्हणतात की विचार आला त्यात काय बिघडले? लोकांना हे माहित नसते की विचार आणि डिस्चार्ज या दोघांची लिंक(संबंध) कशा प्रकारे आहे. विचार जर आपोआप येत नसतील, तर बाहेर पाहिल्याने सुद्धा उत्पन्न होतात.

## [ 14 ] ब्रह्मचर्य प्राप्त करविते ब्रह्मांडाचा आनंद!

या कलियुगात, या दुषमकाळात ब्रह्मचर्य पाळणे खूप कठीण आहे. आपले ज्ञान असे थंडगार आहे की त्यामुळे आत नेहमी गारवा राहतो, म्हणून ब्रह्मचर्य पाळू शकतो. बाकी अब्रह्मचर्य कशामुळे आहे? आतील जळजळीमुळे आहे. पूर्ण दिवस काम करुन जळण, निरंतर जळण उत्पन्न झाली आहे. हे ज्ञान आहे म्हणून मोक्षाला जाण्यासाठी अडचण नाही, परंतु त्याच सोबत ब्रह्मचर्य असेल तेव्हा मग त्याचा आनंद ही असाच असेल ना?! अहोहो... अपार आनंद, जगाने अनुभवलाच नसेल असा आनंद उत्पन्न होतो! अशा ब्रह्मचर्य व्रतातच राहून जर त्याने पस्तीस वर्षाचा काळ काढला, तर त्यानंतर अपार आनंद उत्पन्न होते!

ब्रह्मचर्य व्रत घेण्याची सर्वांनाच गरज नसते. हे तर ज्याच्या उदयात येते, आत ज्याला ब्रह्मचर्याचे खूप विचार येत असतील, तो मग ब्रह्मचर्य व्रत घेतो. ज्याला ब्रह्मचर्य वर्तत असेल, त्याच्या दर्शनाची तर गोष्टच वेगळी ना! एखाद्याच्याच उदयात येते, त्याच्यासाठीच ब्रह्मचर्य व्रत आहे. उदयात आलेले नसेल तर उलट अडचण होते. ब्रह्मचर्य व्रत वर्षभरासाठी घेऊ शकतो किंवा सहा महिन्याचे सुद्धा घेऊ शकतो. तुम्हाला ब्रह्मचर्याचे खूप विचार येत असतील, त्या विचारांना तुम्ही दाबत राहिलात तरी सुद्धा विचार येत असतील तरच ब्रह्मचर्याचे व्रत मागावे; नाहीतर हे ब्रह्मचर्य व्रत मांगण्यासारखे नाही. इथे ब्रह्मचर्य व्रत घेतल्या नंतर व्रत तोडणे हा भयंकर अपराध आहे. तुम्हाला कोणी जबरदस्ती केलेली नाही की तुम्ही व्रत घेतलेच पाहिजे.

या काळात तर आयुष्यभरासाठी ब्रह्मचर्य व्रत देता येईल असे शक्य नाही. देणे हेच जोखिम आहे. वर्षभरासाठी देऊ शकतो. पण जर संपूर्ण आयुष्यभराची आज्ञा घेतली आणि मग व्रतभंग केले, तर तो स्वत: तर पडतोच आपल्यालाही त्यात निमित्त बनवतो. जर आपण महाविदेह क्षेत्रात वीतराग भगवंताजवळ बसलेले असू, तर तिथेही येऊन आपल्याला उठवेल आणि म्हणेल, 'कशासाठी आज्ञा दिली होती ? तुम्हाला शहाणपणा करायला कोणी सांगितले होते ? वीतराग भगवंताजवळ सुद्धा आपल्याला निवांतपणे बसू देणार नाही ! म्हणजे स्वत: तर पडेल पण दुसऱ्यालाही ओढून घेऊन जाईल. म्हणून भावना कर आणि आम्ही तुला भावना करण्याची शक्ति देत आहोत. पद्धतशीर भावना कर, घाई करु नकोस. जितकी घाई तितकी कमतरता.

जर हे ब्रह्मचर्य व्रत घेशील आणि त्याला संपूर्णपणे पाळशील, तर वर्ल्डमध्ये आश्चर्यकारक स्थान प्राप्त करशील आणि इथून सरळ एकावतारी बनून मोक्षाला जाशील. आमच्या आज्ञेत बळ आहे, जबरदस्त वचनबळ आहे. जर तू कमी पडला नाहीस तर व्रत तुटणार नाही, एवढे सारे वचनबळ आहे.

तोपर्यंत आत सर्व चांगले तपासून पाहावे की भावना जगत कल्याणाची आहे की मान मिळवण्याची ? स्वत:च्या आत्म्याची परिक्षा करुन तपासून पाहिले तर सर्व समजेल असे आहे. कदाचित आत मान असेल तर तोही निघून जाईल.

एकच खरा माणूस असेल तर तो जगाचे कल्याण करु शकेल ! संपूर्ण आत्मभावना असली पाहिजे. एक तास सतत भावना करत रहा. आणि कदाचित तुटली तर जोडून पुन्हा चालू कर.

जास्तीत जास्त जगाचे कल्याण केव्हा होते ? त्यागमुद्रा असते तेव्हा अधिक होते. गृहस्थमुद्रेत जगाचे कल्याण जास्त प्रमाणात होत नाही, वरकरणी सर्व होते. परंतु आतील स्तरावर सगळीच माणसं प्राप्त करु शकत नाहीत ! वरुन सर्व मोजका वर्ग प्राप्त करुन घेतो, पण सर्वसामान्य जनता प्राप्त करु शकत नाही. त्याग आपल्यासारखा असायला पाहिजे. आपला त्याग अहंकारपूर्वकचा नाही ना ?! आणि हे चारित्र तर खूप उच्च म्हटले जाते !

'मी शुद्धात्मा आहे' हे निरंतर लक्षात राहते, हे सर्वात महान ब्रह्मचर्य. याच्यासारखे दूसरे ब्रह्मचर्य नाही. तरीही आत जर आचार्यपद प्राप्त करण्याची भावना असेल तर तिथे बाहेरील ब्रह्मचर्य सुद्धा पाहिजे, त्याला स्त्री असलेली चालत नाही.

फक्त हे एक अब्रह्मचर्य जरी सोडले तरी संपूर्ण संसार मावळतो, भराभर, वेगाने! फक्त ब्रह्मचर्य पाळल्याने तर संपूर्ण जगच समाप्त होऊन जाते ना! नाहीतर हजारो वस्तू सोडल्या, तरीही काही भलं होत नाही.

ज्ञानी पुरुषांकडून चारित्र्य ग्रहण केले, फक्त ग्रहणच केले आहे, अजून पालन तर केलेच नाही, तरीसुद्धा तेव्हापासूनच खूप आनंद वाटतो. तुला थोडाफार आनंद वाटतो का?

**प्रश्नकर्ता :** वाटतो ना, दादा! त्याचवेळी आत सर्व निरावरण होऊन गेले.

**दादाश्री :** घेतल्याबरोबरच निरावरण झाले ना? घेते वेळी त्याचे मन क्लीयर (निर्मळ) असायला पाहिजे. त्याचे मन त्यावेळी क्लीयर होते, ते मी जाणून घेतले होते. याला चारित्र्य ग्रहण केले असे म्हटले जाते! व्यवहार चारित्र्य! आणि ते 'पाहणे' व 'जाणणे' ठेवले, ते झाले निश्चय चारित्र्य! चरित्र्याचे सुख या जगाने समजलेलेच नाही. चरित्र्याचे सुख तर वेगळ्याच प्रकारचे असते.

**प्रश्नकर्ता :** विषयापासून सुटला असे केव्हा म्हटले जाते?

**दादाश्री :** त्याला नंतर विषयासंबंधी एकही विचार येत नाही.

विषयासंबंधी कोणतेही विचार नाहीत, ती दृष्टी नाही, ती लाइनच नाही. जणु काही तो जाणतच नाही अशा प्रकारचे असते, त्याला ब्रह्मचर्य म्हटले जाते.

## [ 15 ] 'विषय विकारा' समोर 'विज्ञान'ची जागृति

**प्रश्नकर्ता :** ही गोष्ट स्वत:ला कशी समजेल की यात स्वत: तन्मयाकार झाला आहे?

**दादाश्री :** त्यात 'स्वत:चा' विरोध असतो 'स्वत:चा' विरोध हाच तन्मयाकार न होण्याची वृत्ति. 'स्वत:ला' विषयाच्या संगतीमध्ये एकाकार व्हायचेच नाही, त्यामुळे 'स्वत:चा' विरोध तर असतोच ना? विरोध राहिला हाच वेगळेपण आणि जर चुकून तन्मायाकार झाले, तर मग त्याचे प्रतिक्रमण करावे लागते.

**प्रश्नकर्ता :** स्वत:चा विरोध निश्चयाने तर आहेच. तरीही असे होते की, उदय असे येतात की त्यात तन्मायाकार होऊन जातो, तर हे काय आहे?

**दादाश्री :** विरोध असेल तर तन्मायाकार होऊच शकत नाही, आणि तन्मायाकार झालात तर 'अडखळला' असे म्हटले जाईल. जो असा अडखळतो त्याच्यासाठी प्रतिक्रमण आहेच.

त्यासाठी दोन्ही दृष्टी ठेवाव्या लागतात. तो शुद्धात्मा आहे, ही दृष्टी तर आपल्याकडे आहेच. आणि दुसरी दृष्टी (थ्री विजन) थोडेही आकर्षण झाले की लगेच ती दुसरी दृष्टी (थ्री वीजन) ठेवली पाहिजे, नाहीतर मोह उत्पन्न होतो.

पुद्‌गलचा स्वभाव जर ज्ञानासहित राहत असेल, तर आकर्षण होणारच नाही. परंतु पुद्‌गलचा स्वभाव ज्ञानासहीत राहत असेल, असे नसतेच ना कुठल्याही मनुष्याला. पुद्‌गलचा स्वभाव आम्हाला तर ज्ञानासहित राहतो.

**प्रश्नकर्ता :** पुद्‌गलचा स्वभाव जर ज्ञानासहित राहत असेल तर आकर्षण होत नाही, हे समजले नाही.

**दादाश्री :** ज्ञानपूर्वक म्हणजे असे की, कोणत्याही स्त्रीने किंवा पुरुषाने वाटेल तसे कपडे घातले असतील तरीही ते कपड्याशिवाय दिसतात, ते झाले ज्ञानासहितचे फर्स्ट विजन (पहिले दर्शन). सेकन्ड विजन (दुसरे दर्शन) म्हणजे शरीरावरुन कातडी निघालेली दिसते आणि थर्ड विजन (तिसरे दर्शन) अर्थात आतील सर्व (आतील हाड, मास, रक्त पु मळ-मुत्र वैगेरे) दिसेल. असे दिसल्यावर आकर्षण राहील का?

एखादी स्त्री उभी असेल तिला पाहिले, पण ताबडतोब दृष्टी मागे घेतली, तरी सुद्धा दृष्टी तर पुन्हा तिथल्या तिथेच जाते, अशी जर दृष्टी पुन्हा-पुन्हा तिथेच आकर्षित होत राहिली तर तिला 'फाईल' म्हटली जाते. म्हणजे एवढीच चूक या काळात समजून घ्यायची आहे.

**प्रश्नकर्ता :** अजून जास्त स्पष्टीकरण करुन सांगा की दृष्टी निर्मळ कशी करावी?

**दादाश्री :** 'मी शुद्धात्मा आहे' या जागृतित आले तर मग दृष्टी निर्मळ होते. दृष्टी निर्मळ झाली नसेल तर शब्दांनी पाच-दहा वेळा बोलावे की, 'मी शुद्धात्मा आहे, मी शुद्धात्मा आहे' तरीही निर्मळ होईल. अथवा दादा भगवानांसारखा निर्विकारी आहे, निर्विकारी आहे असे बोलल्यानेही होईल. त्याचा उपयोग करावा लागतो, दुसरे काही नाही. हे तर विज्ञान आहे, त्वरित फळ देते आणि थोडेही बेसावध राहिलात तर दुसरीकडे उडवून टाकेल असे आहे!

**प्रश्नकर्ता :** वास्तवात जागृती मंद कशाने होते?

**दादाश्री :** एकदा त्यावर आवरण येते. त्या शक्तिचे रक्षण करणारी जी शक्ति आहे ना, त्या शक्तिवर आवरण येत असते, ती काम करणारी शक्ति कुंठित होऊन जाते. तेव्हा मग जागृति मंद होत जाते. ती शक्ति कुंठित झाली की मग काहीही होऊ शकत नाही. ती परिणामकारक राहत नाही. मग तो पुन्हा मार खाईल, मार खातच राहील. मग त्याचे मन, वृत्ती, हे सर्व देखील त्याला उलटे समजावतात की, 'आता आपल्याला काही हरकत नाही. इतके सर्व तर आहे ना?

**प्रश्नकर्ता :** त्या शक्तिला रक्षण देणारी शक्ति म्हणजे काय?

**दादाश्री :** एकदा स्लिप झाला(घसरला), तर आत स्लिप न होण्याची जी शक्ति होती, ती कमी होते. अर्थात ती शक्ति सैल होत जाते. म्हणजे जसे बाटलीचे बूच सैल झाल्यावर बाटली जर आडवी पडली तर दुध बाटलीतून आपोआप बाहेर निघते, आणि आधी तर आपल्याला बूच काढावे लागत होते.

## [ 16 ] घसरणाऱ्यांना, उठवून धावयला लावतात....

तुम्हाला तर 'घसरुन पडायचे नाही,' असे नक्की करायचे आहे आणि जर घसरलात तर मी माफ करायचे. जर आत तुमचे बिघडू लागले तर लगेच मला कळवा. जेणे करुन त्यावर काही उपाय होऊ शकेल! पटकन थोडीच सुधरणार आहे? हो, बिघडण्याचीही शक्यता असते!

असे आहे की, ह्या अपराधाचे फळ काय आहे, हे जोपर्यंत जाणत नाही, तोपर्यंत ते अपराध होतच राहणार. विहिरीत का कोणी पडत नाही? हे वकिल कमी गुन्हे करतात, असे का? तर ह्या गुन्हाचे हे फळ मिळेल, असे त्यांना माहित असते. म्हणून अपराधाचे फळ काय आहे हे जाणले पाहिजे. आधीच जाणून घ्यावे की, अपराधाचे फळ काय मिळेल? हे चुकीचे करत आहे. त्याचे फळ काय मिळेल? हे माहित करुन घेतले पाहिजे.

ज्याला दादांचे निदिध्यासन राहते, त्याचे सर्वच ताळे उघडतात. दादांसोबत अभेदता हेच निदिध्यासन आहे!!! खूप पुण्य असेल तेव्हा असे (निदिध्यासन) राहते. आणि ज्ञानींच्या निदिध्यासनाचे साक्षात फळ मिळते. ते निदिध्यासन, स्वतःच्या शक्तिला त्यानुसार करते, तद्रुप बनवते. कारण की 'ज्ञानीं' चे अचिंत्य चिंतामणी स्वरुप आहे, म्हणून ते रुप करुन टाकते. 'ज्ञानीं' चे निदिध्यासन निरालंब बनवते. मग 'आज सत्संग झाला नाही, आज दर्शन झाले नाही' असे काही त्याला वाटत नाही. ज्ञान स्वतः निरालंब आहे, तसेच स्वतःलाही निरालंबी व्हावे लागते, 'ज्ञानीं' च्या निदिध्यासनाने.

ज्याने जगत कल्याणाचे निमित्त बनण्याचा वसा घेतला आहे, त्याला जगात कोण अडवू शकेल? अशी कोणतीही शक्ति नाही की त्याला अडवू शकेल. संपूर्ण ब्रह्मांडातील सर्व देवलोक त्याचावर फुलांचा वर्षाव करीत आहेत. म्हणून ते एक ध्येय नक्की करा ना! जेव्हापासून नक्की केले तेव्हापासूनच या शरीराला आवश्यक असणाऱ्या वस्तुंची चिंता करावी लागत नाही. जोपर्यंत संसारीभाव आहेत तोपर्यंत आवशक्यतेची चिंता करावी लागते. पहा ना, या 'दादां' चे कसे ऐश्वर्य आहे! ही एकच प्रकारची इच्छा उरली की मग त्याचे कामच झाले.

आणि दैवी सत्ता तुमच्या सोबत आहे. हे देव तर सत्ताधीश आहेत, ते निरंतर तुम्हाला मदत करतील, अशी त्यांची सत्ता आहे. असे एकच ध्येय असलेल्या पाचच व्यक्तिंची आवश्यकता आहे. दूसरे कोणतेच ध्येय नाही, एक मात्र पक्के ध्येय! अडचणीत पण एकच ध्येय आणि झोपेत पण एकच ध्येय!

सावध रहा. आणि 'ज्ञानी पुरुषां' चा आसरा जबरदस्त ठेवा. संकट कधी येईल हे सांगता येत नाही! पण त्यावेळी 'दादां' ची मदत मागाल, साखळी ओढाल तर 'दादा' हजर होतील!

तुम्ही शुद्ध असाल तर कोणी तुमचे नाव घेऊ शकणार नाही! संपूर्ण जग जरी तुमचे विरोधी झाले तरी मी एकटा तुमच्या सोबत आहे. मला माहित आहे की तुम्ही शुद्ध आहात, म्हणून मी वाटेल त्याला गाठू शकेल असा आहे, मला शंभर टक्के खात्री पटली पाहिजे. तुमच्याकडून जगाला गाठणे शक्य नाही, म्हणून मला तुमची बाजू घ्यावी लागते. तेव्हा अजिबात घाबरु नका. आपण जर शुद्ध आहोत, तर जगात कोणीही आपले नाव घेऊ शकणार नाही! या जगात जर कुणीही दादांबद्दल बोलत असेल तर हा 'दादा' या जगाचा सामना करु शकेल. कारण तो संपूर्ण शुद्ध माणूस आहे, ज्याचे मन जरा सुद्धा बिघडलेले नाही.

## [ 17 ] अंतिम जन्मातही ब्रह्मचर्य तर आवश्यक

ब्रह्मचर्याला तर संपूर्ण जगाने स्वीकारले आहे. ब्रह्मचर्याशिवाय तर कधीही आत्म प्राप्ती होऊ शकतच नाही. जो ब्रह्मचर्याच्या विरुद्ध असेल त्याला कधीही आत्मा प्राप्त होऊ शकत नाही. विषयासमोर तर निरंतर जागृत राहावे लागते, एका क्षणासाठी सुद्धा अजागृती चालत नाही.

**प्रश्नकर्ता :** ब्रह्मचर्य आणि मोक्ष यांचा एकमेकांशी संबंध किती?

**दादाश्री :** खूप घेणे-देणे आहे. ब्रह्मचर्याशिवाय तर आत्म्याचा अनुभव समजणारच नाही ना! आत्म्यात सुख आहे की विषयात सुख आहे हे समजणारच नाही ना?!

**प्रश्नकर्ता :** तर आता दोन प्रकारचे ब्रह्मचर्य आहेत. एक,

अविवाहित ब्रह्मचर्य स्थिती आणि दूसरे लग्न करुन ब्रह्मचर्य पाळत असेल, त्यात उत्कृष्ट कोणते ?

**दादाश्री :** लग्न करुन ब्रह्मचर्य पालन केले जाते ते उत्कृष्ट म्हटले जाते. परंतु लग्न करुन ब्रह्मचर्य पाळणे कठीण आहे, आपल्या येथे कित्येक लोक लग्न करुन ब्रह्मचर्याचे पालन करत आहेत, पण ते चाळीशी पुढचे आहेत.

विवाहितांना देखील शेवटची दहा-पंधरा वर्ष सोडावे लागेल. सर्वांपासून मुक्त व्हावे लागेल. महावीर स्वामी पण शेवटेच बेचाळीस वर्ष मुक्त झाले होते ना! या संसारात स्त्री सोबत तर अमर्याद उपाधि आहे. जोडी बनली की उपाधि वाढते. दोघांची मने कशी एक होतील? किती वेळा मन एक होते? समजा, दोघांनाही कढी आवडते, पण मग भाजीचे काय? तिथे मन एक होत नाही आणि काम बनत नाही. मतभेद असेल तिथे सुख असू शकत नाही.

ज्ञानी पुरुष तर 'ओपन टू स्काय' (आकाशासारखे मोकळे) असतात. रात्री वाटेल त्यावेळी त्यांच्या घरी जा, तरी 'ओपन' टू 'स्काय' च असतात. आम्हाला तर ब्रह्मचर्य पाळावे लागते असे नसते. आम्हाला तर विषयाची आठवणही नसते. ह्या शरीरात ते परमाणूच नसतात ना! म्हणून तर ब्रह्मचर्यसंबंधी अशी वाणी निघते! विषयसंबंधी तर कोणी काही बोललेच नाही. लोकं विषयी आहेत म्हणून लोकांनी विषयासंबंधी उपदेशच केला नाही. आणि आम्ही तर संपूर्ण पुस्तक तयार होईल एवढे सारे ब्रह्मचर्यासंबंधी बोललो आहोत, अगदी शेवटपर्यंतची गोष्ट बोललो आहोत. कारण की आमच्यातील ते परमाणूच संपलेले आहेत, देहाच्या बाहेर आम्ही रहात असतो, बाहेर म्हणजे शेजाऱ्यासारखे निरंतर राहत असतो! नाहीतर असे आश्चर्य मिळणारच नाही ना कधीही?

फळ खाल्ले परंतु पश्चातापासहित खाल्ले तर मग त्या फळामधून पुन्हा नवीन बीज पडत नाही, आणि जर आनंदाने खाल्ले की 'आहोहो, आज तर खूप मज्जा आली,' तर मग पुन्हा नवीन बीज पडते.

खरे तर विषयाच्या बाबतीत लटपटायला होते. सहजही सैल

सोडले तर लटपटू लागतो. म्हणून सैल सोडू नका. ठाम रहायचे. मेलो तरी चालेल पण हा विषय तर नकोच असे ठाम राहिले पाहिजे.

आम्हाला (दादांना) तर लहानपणापासून हे आवडायचेच नाही. असे वाटायचे की लोकांनी यात का म्हणून सुख मानले असेल? तेव्हा मला वाटायचे की हा काय प्रकार? आम्हाला तर लहानपणापासूनच थ्री विजनची प्रॅक्टीस (अभ्यास) झाली होती. म्हणून तर आम्हाला खूपच वैराग्य येत असे, यावर अतिशय किळस येत असे. आणि याच वस्तूसाठी ह्या लोकांची आराधना असते. याला म्हणावे तरी काय?

**प्रश्नकर्ता :** हा जो मागील तोटा आहे त्यास निश्चयाच्या आधारे मिटवू शकतो का?

**दादाश्री :** हो, सगळा तोटा मिटवू शकतो. निश्चय सर्व काही करु शकतो.

भारी उदयकर्म येतो तेव्हा ते आपल्याला हलवून टाकते. आता भारी उदयकर्माचा अर्थ काय? की आपण स्ट्रोंग रुममध्ये(मजबुत खोलीत) बसलेलो असू आणि बाहेर कोणी ओरडाओरडा करत असेल. मग जरी पाच लाख माणसे बोंबा मारत असतील की 'आम्ही मारुन टाकू' असे बाहेरुनच ओरडत असतील, तर ते आपल्याला काय करणार आहेत? बोंबलू द्या त्यांना. त्याच प्रमाणे इथे सुद्धा स्थिरता असली तर काहीही होणार नाही, पण जर स्थिरता तुटली की मग पुन्हा आपल्यावर परिणाम होईल. तात्पर्य हेच की वाटेल ते (उदय) कर्म येतील तेव्हा स्थिरतापूर्वक हे माझे नाही, मी शुद्धात्मा आहे अशा प्रकारे स्ट्रोंग राहिले पाहिजे. नंतर पुन्हा (कर्म) येतील सुद्धा, थोडा वेळ गोंधळातही टाकतील. पण जर आपली स्थिरता असेल तर काहीही होणार नाही.

ही मुले ब्रह्मचर्य पालन करतात ते मन-वचन-कायेने पालन करतात. मनाने तर बाहेरची माणसं पाळू शकतच नाहीत. सर्व वाणीने आणि देहाने पाळतात. आपले हे जे ज्ञान आहे ना, त्यामुळे मनानेही पाळता येते. मन-वचन-कायेने जर ब्रह्मचर्य पालन केले तर त्यासारखी महान शक्ति दुसरी कोणतीही उत्पन्न होऊ शकत नाही. त्या शक्तिमुळे

मग आमच्या आज्ञेत राहू शकतो. नाहीतर ब्रह्मचर्याची शक्ति जर नसेल तर आज्ञेत कशा प्रकारे राहू शकाल? ब्रह्मचर्याच्या शक्तिची तर गोष्टच वेगळी ना?

हे ब्रह्मचारी तयार होत आहेत आणि ह्या ब्रह्मचारिणी पण तयार होत आहेत. यांच्या चेहऱ्यावर जेव्हा तेज येईल तेव्हा मग त्यांना लिपस्टिक आणि पावडर चोपडण्याची गरज उरणार नाही. ओहो! सिंहाचे बाळ बसले आहे असे वाटेल. तेव्हा वाटेल की हो, काहीतरी आहे! हे वीतराग विज्ञान कसे आहे की जर पचले तर सिंहिणीचे दुध पचल्यासारखे आहे, तेव्हा सिंहाच्या बाळासारखे ते वाटतील, नाहीतर ते बकरीसारखे दिसतील!!!

**प्रश्नकर्ता :** हे लोक लग्न करण्याचे नाकारत आहेत, तर त्याला अंतराय कर्म नाही का म्हटले जाणार?

**दादाश्री :** आपण इथून भादरण गावी जाण्यासाठी निघालो, म्हणून काय आपण दुसऱ्या गावांसोबत अंतराय(विघ्न) पाडले? त्यांना जे अनुकूल वाटेल तिथे ते जातील. अंतराय कर्म तर कोणाला म्हणतात की समजा तुम्ही कोणाला काही देत असाल, आणि मी तुम्हाला म्हणेल की, याला देण्यासारखे नाही. म्हणजे मी तुम्हाला आंतरले, म्हणून मला ती वस्तू कधी मिळणार नाही. मला त्या वस्तूचे अंतराय पडले.

**प्रश्नकर्ता :** जर ब्रह्मचर्यच पाळायचे असेल तर, त्याला कर्म म्हणू शकतो का?

**दादाश्री :** हो, त्याला कर्मच म्हटले जाते! त्याचाने कर्म तर बांधलेच जाईल! जोपर्यंत अज्ञान आहे, तोपर्यंत कर्म म्हटले जाईल! मग ते ब्रह्मचर्य असो की अब्रह्मचर्य असो. ब्रह्मचर्याने पुण्यकर्म बांधले जाते आणि अब्रह्मचर्याने पापकर्म बांधले जाते!

**प्रश्नकर्ता :** कोणी ब्रह्मचर्याची अनुमोदना करत असेल, ब्रह्मचारींना पुष्टि देत असेल, त्यांना सर्व प्रकारच्या सुविधा उपलब्ध करुन देत असेल, सर्वकाही करत असेल तर त्याचे फळ काय येईल?

**दादाश्री :** फळाचे आपल्याला काय करायचे? आपल्याला तर

एक अवतारी होऊन मोक्षाला जायचे आहे, आता फळाला कुठे ठेवायचे? त्या फळाच्या बदल्यात तर शंभर स्त्रिया मिळतील, पण अशा फळाला काय करायचे आपण? आपल्याला फळ नको. फळ खायचेच नाही ना आता!

म्हणून मला तर त्यांनी आधीच विचारुन घेतले होते की, 'आम्ही हे जे सर्व करतो याच्याने आमचे पुण्य बांधले जाते का?' मी म्हटले 'नाही बांधले जाणार.' आता हे सर्व डिस्चार्ज रुपात आहे आणि बीज तर शेकले जात आहे सर्व.

**प्रश्नकर्ता :** हे जे सर्व ब्रह्मचारी होतील, हे 'डिस्चार्ज'च म्हटले जाईल ना?

**दादाश्री :** हो, डिस्चार्जच! पण ह्या डिस्चार्ज सोबत त्यांचा जो भाव आहे, तो आत चार्ज होत आहे. आणि भाव असेल तरच ताकद राहते ना! अन्यथा डिस्चार्ज नेहमीच फिके पडून जाते. आणि हा त्यांचा भाव आहे की, आम्हाला ब्रह्मचर्य पाळायचेच आहे, त्याच्याने मजबुती राहते. या अक्रम मार्गात कर्ताभाव किती आहे, किती अंशपर्यंत आहे की आम्ही जी आज्ञा दिली आहे ती आज्ञा पाळायची, इतकाच कर्ताभाव आहे. जिथे कुठलीही गोष्ट पाळावीच लागते तिथे कर्ताभाव आहे. म्हणजे 'ब्रह्मचर्य पाळायचेच आहे.' यात पाळणे हा कर्ताभाव आहे, बाकी ब्रह्मचर्य हे तर डिस्चार्ज आहे.

**प्रश्नकर्ता :** परंतु ब्रह्मचर्य पाळणे हा कर्ताभाव आहे का?

**दादाश्री :** हो, पाळणे हा कर्ताभाव आहे. आणि या कर्त्याभावाचे फळ त्यांना पुढील जन्मात सम्यक् पुण्य मिळेल. म्हणजे काय तर कुठल्याही अडचणींशिवाय सहजपणे सर्व वस्तु उपलब्ध होतील आणि असे करत करत मोक्षाला जायचे. तीर्थंकरांचे दर्शन होईल आणि तीर्थंकरांच्या जवळ राहण्याची संधी पण मिळेल. अर्थात् त्याचे सर्व संयोग खूपच सुंदर असतील.

**प्रश्नकर्ता :** रविवारचा उपवास आणि ब्रह्मचारी यांचे काय कनेक्शन(अनुसंधान) आहे?

**दादाश्री :** हा रविवारचा उपवास कशासाठी करतो? विषयाच्या विरोधात बसला आहे. विषय विकार माझ्यापर्यंत येऊच नये, म्हणून विषयाचा विरोधी झाला, तेव्हापासूनच निर्विषयी बनला. मी सुद्धा यांना विषयाचा विरोधीच बनवित आहे. कारण त्यांच्याकडून सहजपणे विषय सुटेल असे शक्य नाही, हे तर सर्व चीभुळ (काकडी सारखे पण गोल फळ, जे पिकल्यानंतर थोडा स्पर्श करताच फुटून जाते) आहेत. हे तर दुषमकाळातील बिलबिलीत चीभुळ म्हटले जातील. यांच्याकडून काहीच सुटणार नाही, म्हणून तर मला असे दुसरे उपाय करावे लागतात ना?!

खरे म्हटले तर हे विज्ञान आहे की 'तुम्ही असे करा किंवा तुम्ही तसे करा' असे काही बोलू शकत नाही, पण हा काळच असा आहे! म्हणून आम्हाला असे सांगावे लागते. या जीवांचा काही नेमच नाही ना? हे ज्ञान घेऊन उलट चुकीच्या मार्गावर सुद्धा जातील. म्हणूनच आम्हाला सांगावे लागते आणि तेही आमचे वचनबळ असल्यामुळे मग काही हरकत नाही. आमच्या वचनासहित(सांगण्यावरुन) करतात म्हणून त्यांना कर्तापदाची जोखिमदारी नाही ना! आम्ही सांगितले की 'तुम्ही असे करा.' म्हणून मग तुमची जोखिमदारी नाही आणि यात माझीही जोखिमदारी राहत नसते!!!

आता असे अनुपम पद सोडून उपमा असलेले पद कोण ग्रहण करेल? ज्ञान आहे तर मग जगभराच्या खरकट्याला कोण शिवेल? जगाला प्रिय असे सर्व विषय ज्ञानी पुरुषांना खरकट्यासारखे वाटतात. जगाचा न्याय कसा आहे की ज्याला लक्ष्मीसंबंधी विचार येत नसतील, विषय-विकार संबंधी विचार येत नसतील, जो देहापासून निरंतर वेगळा राहत असेल. त्याला जग 'देव' म्हटल्याशिवाय राहणार नाही!

## [ 18 ] दादाजी देतात पुष्टि, आप्तपुत्रींना

जग तर हे जाणतच नाही, की (या शरीरात) हे सर्व रेशमी चादरीत लपेटलेले आहे? स्वत:ला आवडत नाही तोच कचरा या रेशमी चादरीत (चामडीत) गुंडाळलेला आहे. असे तुम्हाला वाटते की नाही? इतके जरी समजले तरीही वैराग्यच येईल ना? इतके भान राहत नाही. म्हणून तर हे जग असे चालूच आहे ना? या भगिनींमधून अशी जागृती

कोणालाही असेल का? एखादा मनुष्य सुंदर दिसत असेल परंतु जर त्याला सोलून काढले तर आतून काय निघेल? एखादा मुलगा चांगले कपडे घालून, नेकटाई-बेकटाई घालून बाहेर जात असेल, पण त्याला जर कापले तर त्यातून काय निघेल? उगाच तू नेकटाई कशाला घालतोस? मोहवाल्या लोकांना भान नाही. ते सुंदरता पाहून गोंधाळून जातात बिचारे! जिथे मला तर सर्व स्पष्ट(जसे आहे तसे) आरपार दिसते.

अशा रितीने स्त्रियांनी पुरुषांना पाहायला नको आणि पुरुषांनी स्त्रियांना पाहायला नको. कारण की ते आपल्या उपयोगाचे नाही. दादांजींनी सांगितले होते की. हाच कचरा आहे, मग यात पाहण्यासारखे काय राहिले?

म्हणजे आकर्षित होण्याचेही कायदे आहेत की अमुक ठराविक ठिकाणीच आकर्षण होत असते. प्रत्येक ठिकाणी काही आकर्षण होत नाही. आता हे आकर्षण कशामुळे होते, ते तुम्हाला सांगतो.

ह्या जन्मात आकर्षण होत नसेल, तरीही एखाद्याला पाहिले, की आपल्या मनात विचार येतो 'ओहोहो, हा पुरुष किती सुंदर आहे, देखणा आहे.' असे आपल्याला वाटले की त्याचबरोबर पुढील जन्माची गाठ पडते. यामुळे मग पुढील जन्मी आकर्षण होते.

निश्चय त्यास म्हणतात की जे कधी विसरणारच नाही. आपण शुद्धात्म्याचा निश्चय केला आहे. ते विसरत नाही ना? थोडा वेळ जरी विसरलो, तरी नंतर पुन्हा लक्षात येतेच. यालाच निश्चय म्हणतात.

निदिध्यासन म्हणजे 'ही स्त्री सुंदर आहे किंवा हा पुरुष देखणा आहे' असा विचार केला अर्थात तितका वेळ ते निदिध्यासन झाले. विचार केला की लगेचच निदिध्यासन होते. मग तो स्वतः तसा होऊन जातो. म्हणजे आपण जर असे पाहिले तरच ही झंझट उभी राहते ना? त्यापेक्षा डोळे खाली करुनच चालले पाहिजे, दुसऱ्यांशी नजर मिळवूच नये. संपूर्ण जग एक फसवणूकच आहे. एकदा फसल्यानंतर सुटकाच नाही. कितीतरी जन्म व्यतित होतात, पण तरीही त्याचा अंत येतच नाही!

पती, पती सारखा असेल की तो कुठेही गेला, तरी सुद्धा एक क्षण देखिल आपल्याला विसरत नाही असा असेल तर ठीक आहे, पण असे तर कधीच शक्य होत नाही. मग अशा पतीचे काय करायचे?

या काळातील मनुष्य प्रेमाचे भुकेले नाहीत, विषयाचे भुके आहेत. जो प्रेमाचा भुका असतो त्याला विषय मिळाला नाही तरीही चालते. असे प्रेमभुके भेटले तर त्यांचे दर्शन करु. विषयभुके म्हणजे काय, तर संडास. संडास ही विषयभुक आहे.

जर कधी जिव्हाळ्याचे प्रेम असेल तर संसार आहे, अन्यथा विषय हे तर संडासच आहे. ते नंतर नैसर्गिक हाजतमध्ये गेले. त्याला हाजतमंद म्हणतात ना? जसे सीता आणि रामचंद्रजी विवाहितच होते ना? सीतेला घेऊन गेले तरीही श्रीरामाचे चित्त सीतेत आणि केवळ सीतेतच होते. आणि सीतेचे चित्तही फक्त श्रीरामामध्येच होते. विषय तर चौदा वर्षे पाहिला देखिल नव्हता, तरीही चित्त एकमेकांशी जोडलेलेच होते. यालाच (खरे) लग्न म्हणतात. बाकी यांना तर हाजतमंद म्हणतात, नैसर्गिक हाजत!

म्हणजे पति असेल तर झंझट ना? परंतु जर ब्रह्मचर्य व्रत घेतले असेल तर या विषयसंबंधी काही झंझटच नाही ना! आणि सोबत असे ज्ञान असेल मग तर (मोक्षाचे) कामच साधून घेणार!

या भगिनीचा तर निश्चय आहे की, 'एका जन्मताच मोक्षाला जायचे आहे. आता इथे राहणे शक्य नाही, म्हणून' एक अवतारीच व्हायचे आहे. अत: तिला सर्वच साधने उपलब्ध झाली, ब्रह्मचर्यची आज्ञा सुद्धा मिळाली!

**प्रश्नकर्ता :** आम्ही पण एकच अवतारी होणार का?

**दादाश्री :** तुला अजून वेळ लागेल. तुझे सध्या आमच्या सांगण्याप्रमाणे चालु दे. एक अवतारी तर आज्ञेत आल्यानंतर, या ज्ञानात आल्यानंतर काम होईल. तसे तर आज्ञेशिवाय दोन-चार जन्मात मोक्ष होणारच आहे, परंतु (जर संपूर्ण) आज्ञेत राहीलात तर एक अवतारी होता येईल! ज्ञानात आल्यानंतर आमच्या आज्ञेत यावे लागते. अजून

काही तुम्हा सर्वांना अशी ब्रह्मचर्याची आज्ञा दिली नाही ना? आणि तशी आज्ञा आम्ही लवकर देतही नाही. कारण की सर्वांना पाळता येत नाही, जमत नाही. त्यासाठी तर मन खूप मजबुत असावे लागते.

जर तुला ब्रह्मचर्य पाळायचे असेल तर इतके सावध रहायचे की परपुरुषाचा विचार देखील येता कामा नये. आणि विचार आलाच तर ताबडतोब (प्रतिक्रमण करुन) धुऊन टाकायचा.

एक शुद्धचेतन आहे आणि एक मिश्रचेतन आहे. मिश्रचेतनात जर फसलात तर आत्मज्ञान प्राप्त केले असेल, तरीही त्याला भटकवते. म्हणजे यात विकारी संबंध झाला तर भटकावे लागते. कारण आपल्याला मोक्षाला जायचे आहे आणि जर त्या व्यक्तिचा जन्म तीर्यंचगतीत (पशु) होणार असेल तर आपल्यालाही तिथे खेचून जाईल. विकारी संबंध झाला म्हणून तिथे जावेच लागते. म्हणून विकारी संबंध उत्पन्नच होणार नाही इतकेच पहायचे. मनानेही बिघडलेले नसेल तेव्हा चारित्र्य म्हटले जाते. त्यानंतर हे सर्व तयार होऊन जातील. मन बिघडले तर मग सर्व फ्रेक्चर होऊन जाते. नाहीतर एक-एका मुलीत कितीतरी शक्ति असते! आणि ती काय अशी-तशी शक्ति आहे का? ह्या तर हिंदुस्तानातील स्त्रिया असतील आणि त्यांच्याजवळ वीतरागांचे विज्ञान असेल, मग काय बाकी राहिले?

'ज्ञानी पुरुषां' कडून स्वत:चे कल्याण करुन घ्यायचे आहे. स्वत: कल्याणस्वरुप झाला की मग बोलल्याशिवायच लोकांचे कल्याण होते. आणि जी लोकं बोलत राहतात त्यांच्याकडून काहीही होत नाही. फक्त भाषणे केल्याने, बोल बोल केल्याने काही होत नसते. बोलल्याने तर उलट बुद्धि इमोशनल (भावुक) होते. अगदी सहजपणेच फक्त ज्ञानींचे चारित्र्य पाहिल्याने, त्यांचे दर्शन केल्यानेच सर्व भाव शमून जातात. म्हणून त्यांनी तर मात्र स्वत:च ते रुप होऊन जाण्यासारखे आहे! 'ज्ञानी पुरुषांजवळ राहून ते रुप व्हावे. अशा फक्त पाचच मुली तयार झाल्या तर त्या कितीतरी लोकांचे कल्याण करतील!' संपूर्णपणे निर्मळ व्हायला हवे. आणि 'ज्ञानी पुरुषां' जवळ निर्मळ होऊ शकतात आणि निर्मळ होणारही आहेत!

# समजपूर्वक प्राप्त ब्रह्मचर्य ( उत्तरार्ध )

## खंड : 1
## विवाहितांसाठी ब्रह्मचर्याची चावी

### [ 1 ] विषय नाही, पण निडरता हे विष

हे विज्ञान प्रत्येकाला, विवाहितालाही मोक्षाला घेऊन जाईल. पण ज्ञानींच्या आज्ञेनुसार चालले पाहिजे. एखादा डोक्याचा मिजाजवाला (खुमारीवाला) असेल, तो म्हणेल, साहेब मला दुसरे लग्न करायचे आहे. तर मी म्हणेल 'तुझ्यात ताकद हवी. पूर्वी करत नव्हते का लग्न? भरत राजाला तेराशे राण्या होत्या, तरीही मोक्षाला गेले! जर राण्या नडल्या(बाधक) असत्या तर मोक्षाला गेले असते का? तर मग काय बाधक आहे? अज्ञान बाधक आहे.

विषय हे विष नाही, विषयात निडरता (निर्भयता, निर्भीडता) हे विष आहे. म्हणून घाबरु नका. सर्व शास्त्रांनी जोर देऊन सांगितले आहे की, विषय हे विष आहे. कसे विष आहे? विषय हे काय विष असू शकते? विषयात निडरता हे विष आहे. विषय जर विष असते, तेव्हा मग तुम्ही सर्व जर घरी राहत असाल आणि तुम्हाला मोक्षाला जायचे असेल तर मला तुम्हाला हाकलावे लागले असते, की 'जा उपाश्रयात,' इथे घरी पडून राहू नका. पण मला कोणाला हाकलावे लागते का?

भगवंताने जीवांचे दोन प्रकार सांगितले; एक संसारी आणि दुसरे सिद्ध. जे मोक्षात गेले त्यांना सिद्ध म्हटले जाते आणि बाकी सर्वच संसारी. अर्थात तुम्ही जर त्यागी असाल तरीही संसारी आहात आणि हे गृहस्थ पण संसारीच आहेत. म्हणून तुम्ही मनात काही ठेवू नका. संसार नडत नाही, विषय नडत नाही, काहीच नडत नाही, फक्त अज्ञान नडते. म्हणूनच मी पुस्तकात लिहिले आहे की विषय हे विष नाही, विषयात निडरता हे विष आहे.

जर विषय हे विष असते तर भगवान महावीर तीर्थंकर झालेच नसते. भगवान महावीरांनाही मुलगी होती. अर्थात विषयात निडरता हे

विष आहे. आता मला काहीही नडणार नाही, असे वाटणे हेच विष आहे. निडरता शब्द मी यासाठी दिला आहे की विषयाला घाबरले पाहिजे, नाईलाजास्तव विषयात पडावे लागले तरच पडावे. म्हणून विषयाला घाबरा, असे म्हटले आहे. कारण की भगवंत सुद्धा घाबरत होते, मोठेमोठे ज्ञानी सुद्धा घाबरत होते, तर तुम्हीच असे कसे आहात की तुम्हाला विषयाची भीती वाटत नाही? समजा स्वादिष्ट जेवण आले असेल, आमरस-पोळी वैगेरे, हे सर्व तुम्ही निवांत खा परंतु घाबरत खा. घाबरुन का खायचे की जर जास्त खाल्ले गेले तर उपाधि (त्रास) होईल. म्हणून घाबरा.

**प्रश्नकर्ता :** शुद्धात्मा स्वरुप झाल्यानंतर पत्नीसोबत संसार व्यवहार करावा की नाही? आणि ते कसे भाव ठेवून? इथे समभावे निकाल कसा करावा?

**दादाश्री :** हा व्यवहार तर, तुम्हाला पत्नी असेल तर पत्नीसोबत, तुम्ही दोघांना समाधानकारक होईल असा व्यवहार ठेवावा. तुमचे समाधान आणि तिचेही समाधान होईल असा व्यवहार ठेवावा. तिचे असमाधान होत असेल आणि तुमचे समाधान होत असेल असा व्यवहार करु नका. तसेच आपल्याकडून पत्नीला काहीही दु:ख होता कामा नये.

मी तुम्हाला सांगतो की, हे जे 'औषध' (विषय संबंध) आहे हे गोड लागणारे औषध आहे. म्हणून ज्याप्रमाणे औषध नेहमी प्रमाणानूसार घेत असतो, त्याच प्रमाणे हेही प्रमाणातच घ्या. लग्नजीवन केव्हा शोभून दिसेल? तर जेव्हा दोघांनाही ताप चढेल तेव्हा ते औषध घेतील तेव्हा. तापाशिवाय औषध घेतात की नाही? एकाला ताप नसेल आणि औषध घेतले, तर ते लग्नजीवन शोभून दिसत नाही. दोघांना ताप असेल तरच औषध घ्यावे. धीस इज द ओन्ली मेडिसिन (हे फक्त एक औषधच आहे) औषध जरी गोड असले तरीही ते काही दररोज पिण्यासारखे नसते.

पूर्वी राम-सीता वैगेरे सर्व होऊन गेले, ते सर्व संयमवाले होते. पत्नीसोबत संयमी! तेव्हा हा असंयम काय दैवी गुण आहे? नाही, तो पाशवी गुण आहे. मनुष्यात असे नसावे. मनुष्य असंयमी असायला नको. जगाला माहितच नाही की विषय काय आहे? एका वेळेच्या विषयात करोडो जीव मरुन जातात. फक्त एकाच वेळेत. समज नसल्यामुळे यात

मजा घेतो. समजत नाही ना! नाइलाजास्तव जीव मरतील असे असले पाहिजे. पण समजच नसेल तिथे काय करणार?

हे आमचे थर्मामिटर मिळाले आहे. म्हणून आम्ही सांगतो ना की, पत्नीसोबत मोक्ष दिला आहे! आता याचा तुम्हाला जसा सदुपयोग करुन घ्यायचा असेल तसा करा! असे सरळ कोणीच दिले नाही! खूपच सरळ आणि सोपा मार्ग दाखवला आहे. अतिशय सोपा! असे घडलेच नाही! हा निर्मळ मार्ग आहे, भगवंत पण स्वीकारतील असा मार्ग आहे!

**प्रश्नकर्ता :** पत्नीची इच्छा नसेल परंतु पतीच्या दबावामुळे औषध प्यावे लागत असेल, तर काय करावे?

**दादाश्री :** पण आता काय कराल? कोणी सांगितले होते की लग्न करा?

**प्रश्नकर्ता :** जो भोगतो त्याची चूक. पण दादाजी असे काही औषध दाखवा की ज्यामुळे समोरच्या व्यक्तिचे प्रतिक्रमण केले, किंवा असे काही केले तर ते कमी होईल.

**दादाश्री :** ते तर ही गोष्ट स्वतः समजून घेतल्याने, आणि त्यालाही हे समजावल्याने की दादांनी सांगितले आहे, की हे औषध सारखे सारखे पिण्यासारखे नाही. जरा सरळ वागा ना, महिन्यातून सहा-आठ दिवस औषध घेतले पाहिजे. आपली तब्येत चांगली राहिली, डोके चांगले राहिले तर फाईलचा निकाल करता येईल.

अर्थात आम्ही अक्रम विज्ञानात स्वतःच्या पत्नीसोबतच्या अब्रह्मचर्याच्या व्यवहाराला ब्रह्मचर्य म्हटले आहे. परंतु ते विनयपूर्वकचे असावे आणि बाहेर पण स्त्रीवर दृष्टी बिघडवायची नाही. आणि जर दृष्टी बिघडली तर लगेच (प्रतिक्रमण करुन) पुसून टाकले पाहिजे. असे असेल तर त्यास आम्ही या काळात ब्रह्मचारी म्हटले आहे. इतर कुठल्याही जागी दृष्टी बिघडत नाही, म्हणून 'ब्रह्मचारी' म्हटले आहे. याला काही असे-तसे पद म्हणतात का? आणि मग खूप कालावधी नंतर त्याच्या लक्षात येते की यातही खूप मोठी चूक आहे, तेव्हा मग तो हक्काचे विषय पण सोडून देतो.

## [ 2 ] दृष्टी दोषांचे जोखिम

आता तर सर्व खुल्ला बाजारच होऊन गेला आहे ना? म्हणून संध्याकाळी असे वाटते की काहीच सौदा केलेला नाही, पण असेच बघता बघता बारा सौदे होऊनच गेलेले असतात! पाहिल्याबरोबरच सौदा होऊन जातो. दुसरे सौदे होणार असतील ते होतील, पण हे तर पाहताक्षणीच सौदा होऊन जातो! आपले ज्ञान असेल तर असे होत नाही. स्त्री जात असेल तर तिच्या आत तुम्हाला शुद्धात्मा दिसेल, पण इतर लोकांना शुद्धात्मा कसा दिसेल?

एखाद्याच्या घरी आपण लग्नाला गेलो असू, त्या दिवशी आपण खूप काही पाहतो ना? शंभर सौदे तरी होऊनच जातात ना? तर हे सर्व असे आहे! यात तुझा दोष नाही! मनुष्यमात्रला असेच होत असते. कारण की आकर्षणवाले काही बघितले तर तिथे दृष्टी खेचलीच जाते. यात स्त्रियांनाही असे आणि पुरुषांनाही असेच होत असते. आकर्षणवाले पाहिले की सौदा होऊनच जातो!

हे विषय बुद्धीने दूर करु शकू असे आहेत. मी विषयांना बुद्धीनेच दूर केले होते. ज्ञान जरी नसेल तरीही विषय हे बुद्धीने दूर होऊ शकतात. हे तर कमी बुद्धिवाले आहेत म्हणून विषयात टिकून राहिलेले आहेत.

## [ 3 ] बिनहक्काची गुन्हेगारी

तू जर संसारी असशील तर तुझ्या हक्काचे विषय भोग, पण बिनहक्काचे विषय तर भोगूच नकोस. कारण याचे फळ भयंकर आहे. आणि जर तू त्यागी असशील तर तुझी दृष्टी विषयाकडे जाताच कामा नये! बिनहक्काचे घेणे, बिनहक्काची इच्छा करणे, बिनहक्काचे विषय भोगण्याची भावना करणे, याला पाशवता म्हणतात. हक्क आणि बिनहक्क या दोन्हीमध्ये लाईन ऑफ डिमार्केशन (भेद रेषा) तर असायलाच हवी ना? आणि त्या डिमार्केशन लाईनीच्या बाहेर जायचेच नाही. तरी पण लोक डिमार्केशन लाईनीच्या बाहेर गेलेलेच आहेत ना? हीच पाशवता आहे. यालाच पाशवता म्हणतात. हक्काचे भोगण्यास हरकत नाही.

**प्रश्नकर्ता :** बिनहक्काचे भोगण्यात कोणती वृत्ति काम करत असते?

**दादाश्री :** आपली दानत खोटी आहे, ती वृत्ति.

हक्काचे सोडून दुसऱ्या ठिकाणी 'प्रसंग' (विषय संबंध) बनला तर ती स्त्री जिथे जाईल, तिथे आपल्याला जन्म घ्यावा लागेल. ती अधोगतित गेली तर आपल्यालाही तिथे जावे लागेल. आजकाल बाहेर तर असेच सर्व चालू आहे. 'कुठे जन्म होईल?' त्याचा काही नेम नाही. बिनहक्काचे विषय ज्याने भोगले असेल, त्याला तर भयंकर यातना भोगाव्या लागतात. त्याची मुलगी पण एखादया जन्मात चारित्र्यहीन होते. नियम कसा आहे, की ज्याच्यासोबत बिनहक्काचा विषय भोगला असेल तीच नंतर आई किंवा मुलगी बनते.

हक्काच्या विषयासाठी तर भगवंताने सुद्धा मनाई केलेली नाही. भगवंताने मनाई केली तर भगवंत गुन्हेगार ठरेल. हो, बिनहक्काची मनाई केली आहे. जर पश्चाताप केला तर सुटूही शकतो. पण हा तर बिनहक्काचे आनंदाने भोगतो, म्हणून गाठ घट्ट होते.

बिनहक्काचे भोगण्यात तर पाचही महाव्रतांचे दोष लागतात. यात हिंसा होत असते, खोटेपणा येतो, ही तर सर्रास चोरी म्हटली जाईल. बिनहक्काचे अर्थात सर्रास चोरी म्हटली जाते. मग त्यात अब्रह्मचर्य तर येतेच आणि पाचवे परिग्रह, हे तर सर्वात मोठे परिग्रह आहे. हक्काचा विषय असेल त्यांच्यासाठी मोक्ष आहे पण बिनहक्काचा विषय असलेल्यांसाठी मोक्ष नाही. असे भगवंतांनी म्हटले आहे!

या लोकांना तर कसले भानच नसते ना! आणि हरैया (निरंकुश, भटकणारे बेवारस पशु) सारखे असतात. हरैया म्हणजे तुम्ही समजलात का? तुम्ही कोणी हरैयाला पाहिलेत का? हरैया म्हणजे ज्याचे हातात आले त्याचे खाऊन टाकतो. या म्हैंस-बंधुला तुम्ही ओळखता का? ते सर्व शेत उध्वस्त करुन टाकतात.

अशी खूप कमी माणसं आहेत की ज्यांना याचे थोडे तरी महत्व समजले आहे. बाकी तर जोपर्यंत मिळाले नाही तोपर्यंत हरैया नाही! मिळाले की हरैया व्हायला वेळच लागत नाही. हे आपल्याला शोभत

नाही ! आपल्या हिंदुस्तानाची तर किती डेवलप प्रजा! आपल्याला तर मोक्षाला जायचे आहे!

अब्रह्मचर्याचे तर असे आहे की ह्या जन्मात पत्नी झाली असेल, किंवा दूसरी रखैल (ठेवलेली स्त्री) असेल तर पुढील जन्मात ती स्वतःची मुलगी होऊन येते, अशी या संसाराची विचित्रता आहे. म्हणूनच समंजस माणसे ब्रह्मचर्य पाळून मोक्षाला गेले ना!

## [ 4 ] एक पत्नीव्रत म्हणजेच ब्रह्मचर्य

ज्याने लग्न केले आहे, त्याच्यासाठी आम्ही एकच नियम ठेवला आहे की तू (पत्नीशिवाय) दुसऱ्या कुठल्याही स्त्री वर दृष्टी बिघडवायची नाही. आणि जर कधी दृष्टी बिघडली तर प्रतिक्रमण विधी करायची आणि नक्की करायचे की पुन्हा कधी असे करणार नाही. स्वतःच्या पत्नीशिवाय दुसऱ्या स्त्री कडे बघत नाही, दुसऱ्या स्त्री वर ज्याची दृष्टी जात नाही, दृष्टी गेली तरी त्याच्या मनात विकारी भाव उत्पन्न होत नाहीत, विकारी भाव झाला तर स्वतः खूप पश्चाताप करतो, त्यास या काळात एक पत्नी असून सुद्धा ब्रह्मचर्य म्हटले जाते.

आजपासून तीन हजार वर्षांपूर्वी हिंदुस्तानात शंभरा पैकी नव्वद माणसे एक पत्नीव्रत पाळत होते. एक पत्नीव्रत आणि एक पतिव्रत; किती चांगली माणसे होती ती! परंतु आता तर कदाचित हजारात एखादा असा असेल!

**प्रश्नकर्ता :** समजा जर दोन बायका असतील तर त्यात काय वाईट आहे?

**दादाश्री :** करा ना दोन बायका. करण्यात हरकत नाही. पाच बायका करा तरीही हरकत नाही. पण इतर स्त्रियांवर दृष्टी बिघडवतो, दुसरी स्त्री जात असेल तिच्यावर दृष्टी बिघडवतो त्यास खराब म्हटले जाते. काही नीती-नियम तर असायला हवेत ना?

पुन्हा लग्न करण्यास हरकत नाही. मुसलमानांनी एक कायदा केला की, बाहेर दृष्टी बिघडवायची नाही. बाहेर कोणालाही छेडायचे

नाही. जर तुम्हाला एका पत्नीने समाधान होत नसेल तर तुम्ही दोन करु शकता. त्या लोकांनी कायदा बनवला आहे. की चार पर्यंत तुम्हाला सुट आहे! आणि जर तुम्हाला परवडत असेल तर तुम्ही सुद्धा चार करा ना? नाही कोणी सांगितले? करु दे ना लोकांना बोंबाबोंब! परंतु त्या(पहिल्या) पत्नीला दु:ख नाही झाले पाहिजे.

या काळात एक पत्नीव्रताला आम्ही ब्रह्मचर्य म्हटले आहे आणि तीर्थंकर भगवान होते त्यावेळी ब्रह्मचर्याचे जे फळ मिळत होते, तेच फळ त्यांना प्राप्त होईल. याची आम्ही गॅरेंटी देतो.

**प्रश्नकर्ता :** एक पत्नीव्रत सांगितले, ते सूक्ष्माने की फक्त स्थुळाने? मन तर जाईल असे आहे ना?

**दादाश्री :** सूक्ष्माने पण राहिले पाहिजे आणि एखाद्या वेळी मन गेले(बिघडले) तर मनापासून वेगळे राहिले पाहिजे. आणि त्याचे सतत प्रतिक्रमण करत रहावे. मोक्षाला जाण्याची लिमिट (मर्यादा) काय? एक पत्नीव्रत आणि एक पतिव्रत. एक पत्नीव्रत किंवा एक पतिव्रताचा कायदा असेल, त्यास लिमिट म्हणतात.

जितके श्वासोच्छवास जास्त वापरले जातात, तितके आयुष्य कमी होते. श्वासोच्छवास कशात जास्त वापरले जातात? भीतीत, क्रोधात, लोभात, कपटात आणि त्याहीपेक्षा जास्त स्त्री संगात. उचित स्त्री संगात तर खूपच वापरले जातात परंतु त्याहीपेक्षा कितीतरी अधिक अनुचित स्त्री संगात वापरले जातात. जणू काही रहाटाचा दोरखंडच उलगडत आहे, भराभर!

**प्रश्नकर्ता :** देवामध्ये एक पत्नीव्रत असेल का?

**दादाश्री :** एक पत्नीव्रत म्हणजे कसे की संपूर्ण आयुष्य एकाच देवीसोबत काढायचे. पण दुसऱ्याची देवी पाहिल्यावर मनात असे भाव होतात की 'आपल्या देवीपेक्षा ती देवी छान आहे' असे नक्कीच वाटते परंतु जे आहे त्यात काही बदल होणार नाही.

**प्रश्नकर्ता :** या देवगतित मुलाचा प्रश्न नाही, तरीही तिथे विषय तर भोगतातच ना?

**दादाश्री :** तिथे असा विषय नसतो. यात तर नुसती घाण आहे. देव तर उभेही राहणार नाहीत. तिथे त्यांचा विषय कसा असतो? फक्त देवी आली आणि तिला पाहिले, यातच त्यांचा विषय पूर्ण झाला, बस! कित्येक देवी-देवतांना तर असे असते की दोघांनी एकमेकांना हाताने स्पर्श केला किंवा समोरासमोर दोघांनी हात दाबून ठेवले यातच त्यांचा विषय पूर्ण झाला. देवी-देवतांमध्ये सुद्धा जसे-जसे उच्च देवलोकात येतात, तस-तसा विषय कमी होत जातो. कित्येक तर फक्त एकमेकांशी बोलले की त्यांचा विषय पूर्ण होऊन जातो. ज्यांना स्त्रीचा सहवास आवडतो असेही देवता आहेत आणि ज्यांना सहजच असे एक तास देवीला भेटले तरीही खूप आनंद होतो, असेही देवता आहेत आणि कित्येक असेही देवता आहेत की ज्यांना स्त्रीची गरजच पडत नाही. अतः असे प्रत्येक प्रकारचे देवलोक आहेत.

## [ 5 ] बिनहक्काचे विषयभोग, नर्काचे कारण

परस्त्री आणि परपुरुष प्रत्यक्ष नर्काचे कारण आहेत. नर्कात जायचे असेल तर तिथे जाण्याचा विचार करा. आम्हाला त्याची हरकत नाही. तुला अनुकूल असेल तर त्या नर्काच्या दुःखाचे वर्णन करतो, ते ऐकताच ताप चढेल, तर जेव्हा तू तिथे भोगशील तेव्हा तुझी काय अवस्था होईल? परंतु स्वतःची पत्नी असेल तर त्यास काही हरकत नाही.

पति-पत्नीच्या संबंधाला निसर्गाने स्वीकारलेले आहे. त्यात जर कधी विशेषभाव झाला नाही तर मग त्यात काही हरकत नाही. निसर्गाने इतके मान्य केले आहे. इतका परिणाम पापरहित म्हटला जातो. परंतु त्यात अन्य पाप खूपच आहेत. एकच वेळा विषय भोगल्याने करोडो जीव मरतात. हे काय कमी पाप आहे? पण तरीही ते परस्त्री सारखे मोठे पाप नाही म्हटले जात.

**प्रश्नकर्ता :** नर्कात जास्त करुन कोण जातात?

**दादाश्री :** शील लुटणाऱ्यांना सातवी नर्क आहे. जितके गोड वाटले असेल, त्याहून अनेक पटीने कडूपणा अनुभवतो, तेव्हा मग तो नक्की करतो की आता नर्कात जायचे नाही. तात्पर्य, या जगात न

करण्यासारखे कार्य जर कोणते असेल तर, (ते आहे शील लुटणे.) कोणाचेही शील लुटू नका. कधीही दृष्टी बिघडू देऊ नका. शील लुटल्यामूळे नर्कात जातो आणि तिथे मार खातच राहतो. या जगात शील समान उत्तम दुसरी कुठलीही वस्तू नाही.

आपल्या इथे या सत्संगात असे दगाफटका करण्याचा जर विचार आला तर मी म्हणेल ही निरर्थक गोष्ट आहे. इथे असा व्यवहार अजिबात चालणार नाही, आणि असा व्यवहार इथे होत आहे असे जर माझ्या लक्षात आले, तर मी हाकलून लावेल.

या जगात तुम्ही वाटेल तसे अपराध केले असतील, वाटेल तसे अपराध करुन येथे आले असाल, तरी सुद्धा जर आयुष्यात पुन्हा कधीही असे अपराध करणार नसाल, तर सर्व प्रकारे मी तुम्हाला शुद्ध करुन देईल.

हे ऐकून तुला काही पश्चाताप होतो का?

**प्रश्नकर्ता :** खूपच होत आहे.

**दादाश्री :** पश्चातापात जळले तरी देखील पापं नष्ट होऊन जातात. दोन-चार जण हे सर्व ऐकून मला म्हणाले की, 'आमचे काय होईल?' मी म्हणालो, 'अरे, भाऊ, मी तुला सर्व नीट करुन देईल. तू आजपासून शहाणा हो.' जाग आली तेव्हापासून सकाळ. त्याची नर्कगति उडवून टाकेल. कारण की माझ्याजवळ सगळे उपाय आहेत. मी कर्ता नाही म्हणून. मी जर कर्ता झालो तर मला बंधन होणार. मी तुम्हालाच दाखवेल की आता तुम्ही असे करा. त्यानंतर ते सर्व संपते आणि सोबत आम्ही अन्य विधी सुद्धा करतो.

परक्या स्त्रीसोबत फिरले तर लोकं बोट दाखवतील ना? म्हणून ते समाजविरोधी (लोकनिंद्य) आहे. आणि त्याचबरोबर आत बऱ्याच प्रकारची उपाधि पण उभी राहते. नर्काच्या वेदना अर्थात इलेक्ट्रिक गॅसमध्ये खूप वर्षांपर्यंत जळत राहायचे! एक इलेक्ट्रिक उष्णतेची वेदनावाला नर्क आहे आणि दुसरा थंडीची वेदनावाला नर्क आहे. तिथे इतकी थंडी आहे की आपण जर एवढा मोठा पर्वत वरुन फेकला तर

तो दगड एवढा मोठा राहणार नाही, पण त्याचे कण-कण वेगळे होऊन सर्वत्र पसरतील!

परस्त्रीच्या जोखीमेचा विचार केला तर त्यात कितीतरी जोखिम आहेत! ती जिथे जाईल तिथे तुम्हाला जावे लागेल, तिला आई बनवावी लागेल! आज अशी पुष्कळ मुले आहेत की जे त्यांच्या पूर्वजन्मात ठेवलेल्या स्त्रीच्या पोटी जन्माला आले आहेत. ह्या सर्व गोष्टी माझ्या ज्ञानात सुद्धा आल्या होत्या. (मागील जन्मी) मुलगा उच्च जातीचा असतो आणि आई खालच्या जातीची असते, आई खालच्या जातीत जाते आणि (तिचा होणारा) मुलगा उच्च जातीमधून खालच्या जातीत परत येतो. किती भयंकर जोखिम! मागील जन्मी जी पत्नी होती, ती ह्या जन्मात आई बनते. आणि ह्या जन्माची आई ती पुढील जन्मी पत्नी बनते. असे हे जोखिमवाले जग आहे! थोडक्यातच समजुन घ्या! प्रकृति विषयी नाही, ही गोष्ट मी दुसऱ्या संर्दभात सांगितलेली परंतु हे तर आम्ही पहिल्यापासून सांगत आलो आहोत की फक्त हे एकच जोखिम आहे.

**प्रश्नकर्ता :** दोन्ही पक्ष सहमत असतील तरीही जोखिम आहे का?

**दादाश्री :** सहमत असतील तरीही जोखिम आहे. दोघेही एकमेकांशी खुश असतील त्याने काय होते? ती जिथे जाणार असेल तिथे तुम्हाला जावे लागेल. तुम्हाला मोक्षाला जायचे आहे आणि तिचे धंदे हे असे असतील. तर तुमची काय अवस्था होईल? गुणाकार (दोघांचा हिशोब) केव्हा जुळतील? म्हणूनच प्रत्येक शास्त्राकारांनी प्रत्येक शास्त्रात विवेकाबद्दल सांगितले आहे की लग्न करा. नाहीतर असा भटका ढोर असेल तर कोण्याचे घर सलामत राहू शकेल? मग 'सेफसाइड' राहिलीच कुठे? राहणारच नाही. तू का बोलत नाहीस? मागच्या काळजीत पडलास काय?

**प्रश्नकर्ता :** हो.

**दादाश्री :** मी तुझे (पाप) धुऊन देईल. आम्हाला तर तुमच्याकडून इतकेच अपेक्षीत आहे की मला भेटल्यानंतर आता तरी कोणतीही दखल

नाही ना? मागील दखल असेल, तर त्यातून सोडवण्यासाठी आमच्याजवळ पुष्कळ उपाय आहेत. तू मला खाजगीत सांगत जा. मी तुला लगेचच धुऊन देईल. कलियुग आहे म्हणून चूक होणार नाही, असे तर शक्यच नाही ना?

एकाशी डायवोर्स (घटस्फोट) घेऊन दुसऱ्यासोबत लग्न करण्याची इच्छा असेल तर त्याची हरकत नाही, परंतु लग्न करावे लागेल. अर्थात त्याची काहीतरी बाउन्ड्री (सीमारेषा) असली पाहिजे. 'विदाउट बाउन्ड्री' अर्थात् हरैया ढोर म्हटले जाईल. मग त्यात आणि मनुष्यात काही फरक राहत नाही.

**प्रश्नकर्ता :** रखेल (बिन लग्नाची ठेवलली स्त्री) ठेवली असेल तर?

**दादाश्री :** रखेल असली, तरीपण ते रजिस्टर्ड(मान्य)असले पाहिजे. आणि मग दुसरी नसावी.

**प्रश्नकर्ता :** यात रजिस्टर करु शकत नाही, केले तर मग संपत्तीत हिस्सा मागते, खूप झंझटी होतात.

**दादाश्री :** संपत्ती तर द्यावी लागेल, जर आपल्याला स्वाद घ्यायचा असेल तर! सरळ राहा ना एक जन्म, का असे वागता? अनंत जन्मांपासून हेच करत आला आहे! एक जन्म तर सरळ राहा ना! सरळ झाल्याशिवाय सुटकाच नाही. साप देखील बिळात शिरताना सरळ होतो की वाकडा चालतो?

**प्रश्नकर्ता :** सरळ चालतो. परस्त्रीमध्ये जोखिम आहे, आणि ते चुकीचे आहे हे आजच समजले. आतापर्यंत तर यात काय चुकीचे आहे? असेच वाटत होते.

**दादाश्री :** तुम्हाला कोणत्याही जन्मात कोणी 'हे चुकीचे आहे' असा अनुभवच करुन दिला नाही, नाहीतर या घाणीत कोण पडेल? त्यात आणखी नर्काचीही जबाबदारी येते!

आपले हे विज्ञान मिळाल्यानंतर हार्टिली (हृदयापासून) पश्चाताप

केला तरीही सर्व पापं जळून जातात. इतर लोकांचे पाप सुद्धा जळून जाते, पण त्यांचे पूर्ण जळत नाही, आपण तर हे विज्ञान मिळाल्यानंतर, जर विषयावर खूप पश्चाताप करत राहिलो, तर यातून बाहेर निघू शकतो!

**प्रश्नकर्ता :** मागे जी गोष्ट सांगितली होती की, पुरुषाने (स्त्रीला) कपट करण्यासाठी प्रोत्साहित केले आहे. म्हणजे यात पुरुष मुख्य कारणरूप आहे. आमचा जो जीवन व्यवहार आहे आणि त्यांचे जे कपट आहे, त्यांची जी गाठ आहे, यात जर मी जबाबदार असेल तर यासाठी विधी करुन द्यावी की मी ते सर्व सोडू शकेन.

**दादाश्री :** हो, विधी करुन देऊ. त्यांचे कपट वाढले, त्यासाठी आपण पुरुष जबाबदार आहोत. बऱ्याच पुरुषांना या जबाबदारीचे भान खूप कमी असते. तो जरी सर्व प्रकारे माझी आज्ञा पाळत असेल, तरीही स्त्रीला भोगण्यासाठी पुरुष तिला काय समजावतो? तिला सांगेल की, आता यात तर काही हरकत नाही. म्हणून बिचाऱ्या स्त्रीकडून चूक घडते. तिला औषध प्यायचे नसते.. तिला प्यायचेच नसते. पण तरीही प्रकृति तर पिणारीच असते ना! प्रकृति त्यावेळी खुश होऊन जाते. पण हे उत्तेजन कोणी दिले? तर पुरुष यासाठी जबाबदार आहे.

या सर्व स्त्रिया ह्या कारणामुळेच स्लिप झाल्या आहेत. कोणी गोड बोलले की तिथे स्लिप होऊन जाते. ही खूप गुह्य गोष्ट आहे, समजेल अशी नाही.

अर्थात या विषयामुळे तो स्त्री झाला आहे. फक्त या एका विषयामुळेच. पुरुषांनी भोगण्यासाठी तिला प्रोत्साहित केले आणि बिचारीला बिघडविले. बरकत नसेल तरीही आपल्यात बरकत आहे असे ती मनात मानून घेते, तर म्हणे, का असे मानून घेतले? असे का मानले? तर पुरुषांनीच तिला पुन्हा पुन्हा सांगितले, म्हणनू तिला वाटते की हे म्हणतात, 'त्यात काय चुकीचे आहे?' असेच काही तिने मानून घेतलेले नाही. तुम्ही म्हणतात की, खूप छान आहेस. 'तुझ्या सारखी स्त्री तर असूच शकत नाही. तिला म्हटले की, 'तू सुंदर आहेस.' तर ती स्वतःला सुंदर मानुन घेते. या पुरुषांनी स्त्रियांना स्त्रीरुपातच ठेवले. आणि स्त्रीला असे वाटते की, मी पुरुषांना मूर्ख बनवते. असे करुन पुरुष स्त्रियांना

भोगून मोकळे होतात. तिला भोगून घेतात. जसे की याच रस्त्याने भटकायचे असेल... हे तुला फारसे समजत नाही ना? थोडे-थोडे तरी?

**प्रश्नकर्ता :** समजतय, कम्प्लीट. पूर्वी तर पुरुषांची काही चूकच नाही अशा प्रकारे सत्संग चालत होते. पण आज ही गोष्ट निघाली तेव्हा समजले की, यात अशा प्रकारे पुरुषही खूप मोठ्या प्रमाणात जबाबदार ठरतात.

**दादाश्री :** पुरुषच जबाबदार आहेत, स्त्रीला स्त्रीरुपात ठेवण्यात पुरुषच जबाबदार आहे.

पती नसेल, पती निघून गेला असेल, काहीही झाले तरीही दुसऱ्याजवळ जाणार नाही. मग तो वाटेल तसा असो, प्रत्यक्ष 'देव' जरी पुरुष होऊन आलेला असेल, पण नाही. 'मला माझा पती आहे, मी विवाहित आहे.' अशा स्त्रीला सती म्हणतात. सध्या सतीत्व म्हणता येईल असे आहे का ह्या लोकांचे? अशा स्त्रिया आहेत का? नेहमी असे नसते, नाही? काळ वेगळा आहे ना? सत्‌युगात असा टाईम येतो कधीतरी, स्त्रियांसाठीच. म्हणून तर सतीचे नामस्मरण करतात ना आपली लोकं!

सती होण्याचा इच्छेमुळे तिचे नाव घेतले असेल तर कधीतरी सती होईल. परंतु आज तर विषय बांगड्यांच्या भावात विकला जात आहे? हे तुम्हाला माहित आहे? नाही समजले, मी काय म्हणतो ते?

**प्रश्नकर्ता :** हो, बांगड्यांच्या भावात विकला जात आहे.

**दादाश्री :** कोणात्या बाजारात? कॉलेजात! कोणत्या भावाने विकले जाते? सोन्याच्या भावात बांगड्या विकल्या जातात. हिऱ्याच्या भावात बांगड्या विकल्या जातात! सगळीकडेच असे नसते. कित्येक स्त्री तर सोने दिले तरी घेणार नाही. वाटेल ते दिले तरीही घेणार नाही! परंतु दुसऱ्या एखाद्या विकल्या पण जातात, आजच्या स्त्रिया. सोन्याच्या किमतीत नाही, तर दुसऱ्या किमतीत, पण विकल्या जातात!

(एखादी स्त्री) पहिल्यापासून सती नसेल परंतु बिघडल्यानंतर

सुद्धा ती सती होऊ शकते. जेव्हापासून निश्चय केला तेव्हापासून ती सती होऊ शकते.

**प्रश्नकर्ता :** जस-जसे सतीच्या गुणांची जोपासना केली जाईल तस-तसे कपट विरघळत जाईल.

**दादाश्री :** सतीचे गुण अंगिकारले तर कपट आपोआपच निघत जाते. तुम्हाला काही सांगावे लागत नाही. जी मूळ (जन्मत:) सती असते तिला पूर्वीचे काहीच डाग नसतात. तुमचे पूर्वीचे डाग राहून जातात आणि नंतर परत तुम्ही पुरुष होता. सतीत्वाने सर्व संपूष्टात येते. जितक्या सती होऊन गेल्या, त्यांचे सर्व पूर्ण होऊन जाते आणि त्या मोक्षाला जातात. थोडे समजले का? मोक्षाला जाण्यासाठी सती व्हावे लागेल. हो, जितक्या सती होऊन गेल्या, त्या सर्व मोक्षाला गेल्या, अन्यथा पुरुष व्हावे लागते.

**प्रश्नकर्ता :** हो, म्हणजे असे निश्चित नाही की जी स्त्री आहे तिला अनेक जन्मांपर्यंत स्त्रीचाच जन्म मिळेल. परंतु लोकांना हे समजत नाही आणि म्हणून त्यावर काही उपाय केला जात नाही.

**दादाश्री :** उपाय केला तर स्त्री, ही पुरुषच आहे. ह्या ग्रंथीला जाणतच नाहीत बिचारे. आणि त्यांना तिथे इन्टरेस्ट येतो, तिथे मजा वाटते. म्हणून तिथे पडून राहतात. आणि दुसऱ्या कोणाला अशा मार्ग माहितही नाही, म्हणून कोणी दाखवतही नाही. हे फक्त सती स्त्रिया एकट्याच जाणतात. सतींना त्यांचे पती, त्या एका पतीशिवाय दुसऱ्या कोणाचा विचार सुद्धा करत नाहीत. कधीच नाही लग्न होताच तिचा पती मेला, निघून गेला तरीही नाही. त्या पतीलाच ती आपला पती मानते. मग अशा स्त्रियांचे कपट पूर्णपणे नष्ट होते.

ह्या मुली बाहेर जात असतील, शिकण्यासाठी जात असतील तरीही शंका. बायकोवर सुद्धा शंका. सगळीकडे दगाफटका! घरात सुद्धा दगाच आहे ना, आजकाल! या कलियुगात तर स्वत:च्या घरातच दगा होत असतो. कलियुग म्हणजेच दगाफटक्याचा काळ. कपट आणि दगा, कपट आणि दगा, कपट आणि दगा! हे सर्व कोणत्या सुखासाठी करतात? आणि ते सुद्धा भान न ठेवता, बेभानपणे!

**प्रश्नकर्ता :** परंतु जर मनात शंकेने पाहण्याची गाठ पडली असेल तर तिथे कोणती 'एडजस्टमेन्ट' घ्यावी?

**दादाश्री :** हे जे तुम्हाला दिसते की याचे चारित्र्य खराब आहे, तर काय पूर्वी नव्हते? हे काय अचानकच उत्पन्न झाले आहे? म्हणून समजुन घेण्यासारखे हे जग आहे, की हे तर असेच असते. या काळात कोणाचेही चारित्र्य पाहायचेच नाही. या काळात तर सगळीकडे असेच असते. बाहेरुन दिसत नाही पण मन तर बिघडतेच. आणि त्यात स्त्री चारित्र्य म्हणजे निव्वळ कपट आणि मोहाचे संग्रहस्थान, म्हणून तर स्त्रीचा जन्म मिळतो. यात सर्वात चांगले तर हेच की जे विषयापासून सुटले असतील.

**प्रश्नकर्ता :** चारित्र्यात तर असेच असते हे आम्ही जाणतो. तरीही मन शंका करते तेव्हा तन्मयाकार होऊन जातो. तिथे कशी 'एडजस्टमेन्ट' घ्यावी?

**दादाश्री :** आत्मा झाल्यानंतर दुसऱ्या कशात पडायचेच नाही. हे सर्व 'फोरेन डिपार्टमेन्ट'(अनात्म विभाग) चे आहे. आपण 'होम' मध्ये (आत्म्यात) राहावे. आत्म्यात राहा ना! असे 'ज्ञान' पुन्हा-पुन्हा मिळणे शक्य नाही, म्हणून (मोक्षाचे) काम काढून घ्या. एका माणसाला त्याच्या पत्नीवर शंका येत असे. मी त्याला विचारले की तुला शंका कशामुळे होते? तू पाहिले त्यामुळे शंका होते? मग तू जेव्हा पाहिले नव्हते तेव्हा तसे होत नव्हते का? आपले लोक तर जो पकडला जातो त्याला 'चोर' म्हणतात. पण जे पकडले गेले नाहीत ते सर्व आतून चोरच आहेत.

तुम्ही आत्मा आहात मग घाबरण्यासारखे राहिलेच कुठे? हे तर जे 'चार्ज' झालेले होते, त्याचेच 'डिस्चार्ज' आहे! जग स्पष्टरुपाने 'डिस्चार्जमय' आहे. 'डिस्चार्ज' च्या बाहेर हे जग नाहीच. म्हणूनच आम्ही सांगत असतो ना, 'डिस्चार्जमय' असल्यामुळे कोणीही अपराधी नाही.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे यात सुद्धा कर्माचा सिद्धांत काम करतो ना?

**दादाश्री :** हो. कर्माचा सिद्धांतच काम करत आहे, दूसरे काहीच

नाही. माणसाचा दोष नाही, हे कर्मच भटकवते बिचाऱ्याला. पण यात जर शंका ठेवली, तर तो विनाकारण मरतो.

म्हणून ज्याला बायकोच्या चारित्र्यासंबंधी शांति हवी असेल, त्याने रंगाने अगदी काळीकुट्ट, गोंदलेली बायको करावी की ज्यामुळे तिच्यावर कोणी आकर्षितच होणार नाही. तिला कोणी ठेवणारच नाही, आणि तीच असे म्हणेल की, मला दुसरा कोणी ठेवणारा नाही. हा जो नवरा मिळाला आहे तोच मला सांभाळणार आहे. 'म्हणून मग ती तुम्हाला सिन्सियर (वफादार) राहील. खूपच सिन्सियर राहील. आणि जर ती सुंदर, देखणी असेल तर लोकं तिला (मनाने) भोगतातच. सुंदर असेल तर लोकांची दृष्टी बिघडणारच! जर कोणी सुंदर बायको केली तर मला (दादाश्रींना) हाच विचार येतो की काय अवस्था होईल याची!

बायको खूप सुंदर असते तेव्हाच तो देवाला विसरतो ना?! आणि नवरा खूप सुंदर असतो तेव्हा ती बाई सुद्धा देवाला विसरते! म्हणून सर्व रितसर असलेले चांगले.

हे लोकं तर कसे आहेत? की जिथे 'हॉटेल' पाहिले, तिथे 'खाल्ले.' शंका ठेवण्यासारखे जग नाही. शंकाच दुःख देणारी आहे. आता जिथे हॉटेल पाहिले, तिथे खाल्ले, यात मग पुरुषही असे करतात आणि स्त्रिया सुद्धा हेच करतात.

पुरुष पण स्त्रियांना धडा शिकवतात आणि स्त्रिया पण पुरुषांना धडा शिकवतात! पण तरी यात स्त्रिया जिंकतात. कारण या पुरुषांमध्ये कपट नसते ना! त्यामुळे पुरुष स्त्रीकडून धोका खात असतो!

अर्थात जोपर्यंत 'सिन्सियारिटी-मोरालिटी' (सदाचार) होते तोपर्यंत संसारसुख घेण्यासारखे होते. आता तर भयंकर धोकेबाजी आहे. या प्रत्येकाला जर मी त्यांच्या बायकोविषयी सांगितले तर कोणीही स्वतःच्या बायको जवळ जाणार नाही. मला सर्वांचेच माहित असते पण मी काही सांगत-करत नाही, कारण की पुरुषही धोका देण्यात काही कमी नाही. परंतु स्त्री तर फक्त कपटचाच कारखाना! कपटचे संग्रहस्थान, दुसरे कुठेच नसते फक्त स्त्रीमध्येच असते.

ही लोकं तर बायकोला यायला जरा उशीर झाला तरी शंका घेतात. शंका घेण्यासारखे नाही. ऋणानुबंधाच्या बाहेर काहीच होणार नाही. ती घरी आल्यानंतर तिला समजवायचे. परंतु शंका करु नये. शंकेमुळे तर उलट अधिक बिघडेल. हो, चेतावणी जरुर द्या. पण शंका करु नका. शंका करणारा मोक्ष गमावून बसतो.

अर्थात आपल्याला जर सुटायचे असेल, मोक्षाला जायचे असेल तर आपण शंका करु नये. कोणी परका माणूस तुमच्या बायकोच्या गळ्यात हात टाकून फिरत असेल आणि हे जर तुमच्या पाहण्यात आले, तर काय आपण विष प्यायचे!

**प्रश्नकर्ता :** नाही, असे कशासाठी करणार!

**दादाश्री :** तर मग काय करायचे?

**प्रश्नकर्ता :** थोडे नाटक करावे लागते, मग समजुत काढावी, त्यानंतर ती जे करेल ते 'व्यवस्थित.'

**दादाश्री :** हो बरोबर आहे.

## [ 6 ] विषय बंद, तिथे भांडणतंटे बंद

या जगात भांडणतंटा कुठे असतो? जिथे आसक्ति असेल तिथेच. भांडण कुठपर्यंत होत राहतात? विषय आहे तोपर्यंत! मग 'माझे-तुझे' करायला लागतात, 'ही तुझी बॅग उचल इथून. माझ्या बॅगेत साड्या का ठेवल्या?' अशी भांडणे विषयात एक आहेत तोपर्यंत. आणि विषयातून सुटल्यानंतर आपल्या बॅगमध्ये ठेवले तरी हरकत नाही. मग भांडण होत नाही? मग काहीच भांडण नाही?

**प्रश्नकर्ता :** पण आपल्याला हे सर्व बघून कंप सुटतो. परत असेही वाटते की रोजचीच अशी भांडणे चालत राहतात, तरीही नवरा-बायकोला याचे समाधान करुन याचा अंत आणण्याची इच्छा होत नाही, हे आश्चर्यच आहे ना?

**दादाश्री :** हे तर कित्येक वर्षांपासून, लग्न झाले तेव्हापासून असे

चालू आहे. लग्न झाले तेव्हापासूनच एका बाजूने भांडणही चालू आहे आणि एका बाजूने विषयही चालू आहे! म्हणून तर आम्ही सांगितले की तुम्ही दोघांनी ब्रह्मचर्य व्रत घ्या, मग जीवन उत्तम होईल. तात्पर्य, हे भांडणतंटे स्वतःच्या गरजेमुळे करतात. तिला माहित आहे की शेवटी तो कुठे जाणार?! आणि त्यालाही माहित आहे की ही तरी कुठे जाणार आहे? अशा प्रकारे समोरासमोर गरजेने टिकून राहिले आहे.

विषयात सुखापेक्षा विषयाच्या परवशतेचे दुःख जास्त आहे! असे जेव्हा समजते तेव्हा मग विषयाचा मोह सुटतो आणि तेव्हाच स्त्री जातीवर (बायकोवर) प्रभाव पाडू शकतो. आणि त्यानंतर हा प्रभाव निरंतर प्रतापात रुपांतर होतो. नाहीतर ह्या जगात मोठमोठ्या महान पुरुषांनी पण स्त्री जातीपासून मार खाल्ला होता. वीतरागच या गोष्टीला समजू शकले! म्हणून त्यांच्या प्रतापामुळेच स्त्रिया दूर राहत होत्या! नाहीतर स्त्री जात तर अशी आहे की वाटेल त्या पुरुषाला चुटकीसरशी लट्टू बनवून टाकते, तिच्याजवळ अशी शक्ति आहे. यालाच स्त्री चारित्र्य म्हटले आहे ना! स्त्री संगापासून तर दूरच राहावे. तिला कोणत्याही प्रकारे जाळ्यात ओढू नये, नाहीतर तुम्ही स्वतःच तिच्या जाळ्यात अडकाल. आणि तीच-तीच झंझट कित्येक जन्मांपासून होत आली आहे ना!

स्त्रिया पतीला दबावात ठेवतात, याचे काय कारण असेल? पुरुष खूप विषयी असतो, म्हणून दबावात ठेवतात. ह्या स्त्रिया खायला घालतात त्यामुळे दबावात ठेवत नाहीत, तर विषयाने दबावात ठेवतात! जर पुरुष विषयी नसेल तर कोणतीही स्त्री त्याला दबावात ठेवू शकत नाही! कमजोरीचाच फायदा घेते. पण जर कमजोरी नसेल तर काहीच करु शकत नाही. स्त्री जाती खूप कपटी आहे आणि आपण पुरुष भोळे! म्हणून तुम्ही दोन-दोन, चार-चार महिन्याचा (विषयात) कंट्रोल (संयम) ठेवला पाहिजे, मग ती स्वतःहून थकून जाते. तेव्हा मग तिला कंट्रोल रहात नाही.

स्त्री वश केव्हा होते? जर आपण विषयात खूप सेन्सिटिव (संवेदनशील) असलो तर ती आपल्याला वश करुन टाकते! पण आपण

जरी विषयी असलो पण त्यात जर सेन्सिटिव होत नसू तर ती आपल्या वश होते! जर ती 'जेवणासाठी' बोलावेल आणि तुम्ही सांगितले की आता नाही, दोन-तीन दिवसानंतर, तर मग ती तुम्हाला वश होईल! अन्यथा तुम्ही तिला वश व्हाल! ही गोष्ट मी पंधरा वर्षाचा असताना समजून गेलो होतो. कित्येक पुरुष तर विषयाची भीक मागतात की 'आजचा दिवस!' अरे, अशी विषयाची भीक मागतात का? मग तुझी काय अवस्था होईल? स्त्री काय करते? डोक्यावर चढून बसेल! सिनेमा पाहायला गेले तर म्हणेल, 'मुलाला उचलून घ्या. 'आपल्या महात्म्यांना विषय असतो पण विषयाची भीक नसते!

एक स्त्री आपल्या नवऱ्याला चार वेळा साष्टांग नमस्कार करायला लावते, तेव्हा कुठे एक वेळा स्पर्श करु देते, अरे मूर्खा! यापेक्षा समाधि घेतली असती तर काय वाईट झाले असते?! समुद्रात समाधि घे, समुद्र तरी सरळ आहे, दुसरी झंझट तर नाही! विषयासाठी चार वेळा साष्टांग!

**प्रश्नकर्ता :** आधी आम्ही असे समजत होतो की, घरच्या कामकाजामुळे भांडण होत असेल. म्हणून घरातील कामकाजात मदत करु लागलो तरीही भांडणच.

**दादाश्री :** अशी सर्व भांडणे होतच राहणार. जोपर्यंत विकारी गोष्टी आहेत, संबंध आहे तोपर्यंत संघर्ष होतच राहाणार. संघर्षाचे मूळच हे आहे. ज्याने विषयावर विजय प्राप्त केला, त्याला कोणीही हरवू शकत नाही, कोणी त्याचे नाव सुद्धा घेऊ शकत नाही. त्याचा प्रभाव पडतो.

जेव्हापासून हिराबा (दादाश्रींची धर्मपत्नी) सोबत माझा विषय बंद झाला तेव्हापासून मी त्यांना 'हिराबा' म्हणू लागलो. त्यानंतर आम्हाला खास काही अडचण आली नाही. त्याआधी विषय संबंधामुळे थोडा फार संघर्ष होत असे. परंतु जोपर्यंत विषयांचा डंख आहे, तोपर्यंत संघर्ष जात नाही. त्या डंखापासून जेव्हा मुक्त होतो तेव्हा (संघर्ष) जातो. आमचा स्वत:चा अनुभव सांगत आहोत.

विज्ञान तर बघा! जगा सोबतची भांडणेच बंद होऊन जातात.

फक्त बायको सोबतच नव्हे, तर साऱ्या जगासोबतची भांडणे बंद होऊन जातात. हे विज्ञानच असे आहे, आणि भांडणे बंद झाली म्हणजे सुटलो.

विषयात घृणा उत्पन्न झाली तरच विषय बंद होतो. नाहीतर विषय कसा बंद होईल?

## [ 7 ] विषय ही पाशवता!

आमच्या वेळी प्रजा एका बाबतीत खूप चांगली होती. विषय विचार नव्हते. कोणत्याही स्त्रीकडे कुदृष्टी नाही. तसे असतात, शेकडा पाच, सात टक्के तसे असतातही. ते फक्त विधवांनाच शोधून काढायचे. दूसरे काही नाही. ज्या घरात कोणी (पुरुष) राहत नसेल तिथे. विधवा म्हणजे पती शिवायचे घर, असे म्हणतात. आम्ही चौदा पंधरा वर्षाचे झालो, तोपर्यंत मुलींना आम्ही बहीण म्हणायचो, खूप दूरचा नातेसंबंध असला तरीही. ते वातावरणच असे असायचे. कारण की लहानपणी दहा अकरा वर्षाचे होई पर्यंत तर दिगंबरी अवस्थेत फिरायचो!

विषयाचा विचारच येत नसे. म्हणून झंझटच नव्हती ना. विषयविकाराची जागृतीच नाही.

**प्रश्नकर्ता :** समाजाचे एक प्रकारचे प्रेशर (दबाव) होते, म्हणून?

**दादाश्री :** नाही, समाजाचे प्रेशर नाही. आई वडीलांचे वर्तन, संस्कार! तीन वर्षाच्या मुलाला हे माहित नसे की माझ्या आई वडीलांचा असा काही संबंध आहे. इतकी सुंदर सिक्रसी(गुप्तता) असे! आणि असे असायचे, त्या दिवशी मुले दुसऱ्या खोलीत झोपत असत. असे आई वडीलांचे संस्कार असायचे. आता तर ठिकठिकाणी बेडरुम. पुन्हा डबलबेड असतो ना?

त्या काळात कोणताही पुरुष स्त्री (पत्नी) सोबत एका अंथरुणात झोपत नसे. त्यावेळी अशी म्हण होती की जो पुरुष रात्रभर स्त्रीसोबत झोपेल तो स्त्री होऊन जातो, तिचे पर्याय स्पर्श करतात. म्हणून कोणी असे करत नसे. हे तर कोणी अक्कलवाल्याने शोधून काढले. म्हणून डबल बेडची विक्री होऊ लागली! म्हणूनच प्रजा डाऊन झाली (खाली

घसरली). डाऊन होण्यात फायदा काय झाला? तर त्यावेळीचे जे तिरस्कार होते ते सर्व निघून गेले. म्हणून आता डाऊन झालेल्यांना वर चढवण्यात वेळ लागणार नाही.

अरे! असे डबल बेड आपल्या हिंदुस्तानात असू शकतात का? कसली जनावरा सारखी माणसं आहेत? हिंदुस्तानचे स्त्री-पुरुष कधीही एका खोलीत नसायचेच. नेहमी वेगळ्या खोलीतच असत. आणि आज हे बघा तरी! आजकालचे तर आई-बापच बेडरुम तयार करुन देतात, डबल बेड! म्हणूनच ही मुले समजून गेली की, या दुनियेत अशीच प्रथा चालत आली आहे. हे सर्व आम्ही पाहिले आहे.

ह्या स्त्रियांची संगत जर मनुष्याने फक्त पंधरा दिवसांसाठी जरी सोडली, पंधरा दिवस दूर राहिला, तर तो देवासारखा होऊन जाईल!

एकांत शैयासन म्हणजे काय? तर शैयेतही कोणी सोबत नाही आणि आसनातही कोणी सोबत नाही. संयोगी 'फाईलचा' कोणत्याही प्रकारचा स्पर्श नाही. शास्त्रकार तर इथपर्यंत मानत होते की, ज्या आसनावर परजाती बसली, त्या आसनावर तू बसशील तर तुला तिचा स्पर्श होईल, विचार येतील.

**प्रश्नकर्ता :** विषय दोषाने जे कर्मबंधन होते, ते कशा स्वरुपाचे असते?

**दादाश्री :** जनावराच्या स्वरुपाचे. विषय पदच जनावर पद आहे. पूर्वी हिंदुस्तानात निर्विषयी-विषय होता. म्हणजे फक्त एका पुत्रदाना पुरताच विषय होता.

**प्रश्नकर्ता :** दादाजी ब्रह्मचर्यावर अधिक जोर देतात आणि अब्रह्मचर्यासाठी तिरस्कार दाखवतात. पण असे केल्याने तर सृष्टी वरील मानवांची संख्याही कमी होईल. तर या बाबतीत आपले काय मत आहे?

**दादाश्री :** इतके सर्व (कुटुंब नियोजनाचे) ऑपरेशन केले तरीही लोकसंख्या कमी होत नाही, मग ब्रह्मचर्य पाळल्याने काय कमी होणार

आहे ? लोकसंख्या कमी करण्यासाठीच तर ऑपरेशन करतात पण तरीही कमी होत नाही ना! ब्रह्मचर्य तर (मोक्षमार्गात) मोठे साधन आहे.

**प्रश्नकर्ता :** ही जे नेचरल प्रोसेस (नैसर्गिक प्रक्रीया) आहे, त्या वर आपण तिरस्कार करीत आहोत असे नाही का म्हटले जाणार ?

**दादाश्री :** ही काही नेचरल प्रोसेस नाही, ही तर पाशवता आहे. माणसात. जर नेचरल प्रोसेस असती तर ब्रह्मचर्य पाळायचे, असे राहीलेच नसते ना! ही जनावरे ब्रह्मचर्य पाळतात बिचारी, सिजन(ऋतु) पुरताच पंधरा-वीस दिवस विषय, नंतर काहीच नाही.

## [ 8 ] ब्रह्मचर्याची किंमत, स्पष्ट वेदन-आत्मसुख

**प्रश्नकर्ता :** हे ज्ञान मिळाल्यानंतर, दादाश्रींचे ज्ञान मिळाल्यानंतर ब्रह्मचर्याची आवश्यकता आहे की नाही ?

**दादाश्री :** जो ब्रह्मचर्य पाळू शकतो त्याच्यासाठी आवश्यकता आहे आणि जो ब्रह्मचर्य पाळू शकत नाही त्याच्यासाठी आवश्यकता नाही. जर आवश्यकता राहिली असती तर जे ब्रह्मचर्य पाळत नाहीत त्या माणसांना रात्रभर झोपच आली नसती, त्यांना वाटले असते की आता तर आपला मोक्ष चुकेल. अब्रह्मचर्य हे चुकीचे आहे, असे समजून घेतले तरीही पुष्कळ झाले.

**प्रश्नकर्ता :** फिलोसॉफर (तत्वज्ञ) असे म्हणतात की, सेक्सला दाबून ठेवल्याने विकृती येते. सेक्स (विषयभोग) आरोग्यासाठी आवश्यक आहे.

**दादाश्री :** त्यांची गोष्ट बरोबर आहे, परंतु अज्ञानींना सेक्सची गरज आहे. नाहीतर शरीरावर आघात होईल. जे ब्रह्मचर्याला समजतात, त्यांना सेक्सची गरज नाही, आणि अज्ञानी माणसाला जर यावर बंधन आणले, तर त्याचे शरीर तुटेल, संपून जाईल.

हा विषय अशी वस्तु आहे की, एकाच दिवसाचा विषय तीन दिवसांपर्यंत कोणत्याही प्रकारची एकाग्रता होऊ देत नाही. एकाग्रता डगमगते. जेव्हा की महिन्याभर विषयाचे सेवन केले नाही, तर त्या व्यक्तिची एकाग्रता डगमगत नाही.

अब्रह्मचर्य आणि दारु, ह्या दोन्ही ज्ञानात खूप आवरण आणणाऱ्या वस्तु आहेत. म्हणून यात खूपच जागृत राहावे. दारुमुळे तर, 'मी चंदुभाऊ आहे' याचे सुद्धा भान राहत नाही ना! मग आत्मा तर विसरुनच जाऊ ना! म्हणूनच भगवंताने (विषयापासून) घाबरण्यास सांगितले आहे. ज्याला संपूर्ण अनुभव ज्ञान झाले असेल, त्याला स्पर्शत नाही, पण तरीही भगवंताच्या ज्ञानाला देखील उपटून फेकून देते! इतके भयंकर यात जोखिम आहे!

ज्याला परिपूर्ण व्हायचे असेल, त्याला तर विषय असायलाच नको. पण तरी तसा काही नियम नाही. त्यासाठी तर शेवटच्या जन्मात शेवटची पंधरा वर्षे विषय सूटला तरी बस झाले. त्यासाठी जन्मोजन्म व्यायाम करण्याची गरज नाही किंवा त्यागी होण्याचीही आवश्यकता नाही. त्याग तर सहज असायला हवा की ते आपोआपच सुटून जाईल! निश्चयभाव तर असाच असावा की मोक्षात जाईपर्यंत जे काही दोन-चार जन्म होतील, ते लग्नाशिवायचे व्यतीत झाले तर उत्तम. यासारखे दुसरे काहीच नाही.

आता हे आत्म्याचे स्पष्टवेदन कुठपर्यंत होत नाही? जोपर्यंत हे विषय विकार जात नाहीत तोपर्यंत स्पष्टवेदन होत नाही. अर्थात हे नक्की आत्म्याचे सुख आहे की दुसरे कोणते सुख आहे, ते 'एक्जेक्ट' (यथार्थ) समजत नाही. ब्रह्मचर्य असेल तर 'ऑन दि मोमेन्ट' (त्याच क्षणी) समजते. स्पष्टवेदन झाले म्हणजे तो परमात्माच होऊन गेला असे म्हटले जाते!

## [ 9 ] घ्या व्रताचे ट्रायल!

आम्ही तुम्हाला वेळोवेळी सावध करीत असतो. पण सावधान होणे हे काही सोपे नाही ना! पण तरीही जर असा प्रयोग केला की महिन्यात तीन दिवस किंवा पाच दिवस आणि जर पूर्ण आठवडाभर (विषयात संयम) केला तर खूपच छान. स्वत:च्याही लक्षात येईल. आठवड्याच्या मधल्या दिवशी तर इतका आनंद होईल! आत्म्याचे सुख आणि आस्वाद येईल की यात किती सुख आहे! याचा तुम्हाला प्रत्यक्ष अनुभव येईल!

कित्येक लोक असे म्हणतात की, माझ्याने विषय सुटत नाही. मी म्हटले, असा वेडापणा का करतोस? थोडे तरी नियम घे ना! त्या नियमात रहा, मग ते नियम सोडू नकोस. ह्या काळात नियम न करुन तर चालणारच नाही! थोडी सूट तर ठेवावी लागते. नाही ठेवावी लागत?

**प्रश्नकर्ता :** जर पुरुषाची इच्छा ब्रह्मचर्य पाळण्याची असेल आणि स्त्रीची इच्छा नसेल तर काय करावे?

**दादाश्री :** नसेल तर त्यात काय हरकत आहे? तिला समजावायचे.

**प्रश्नकर्ता :** कसे समजावायचे?

**दादाश्री :** हे तर असे समजावता समजावता एक दिवस ती ऐकेल, हळूहळू! एकदम बंद नाही होणार. दोघांनीही आपसात समाधानपूर्वक मार्ग निवडा ना! यात काय नुकसान आहे, ते सर्व सांगायचे आणि यावर मंथन करायचे.

मोक्ष पाहिजे असेल तर विषय काढावा लागेल. जवळपास हजार महात्मा आहेत की जे वर्षभरासाठी ब्रह्मचर्यव्रत घेतात. 'मला एका वर्षासाठी व्रत दया' असे म्हणतात. एका वर्षात त्यांच्या लक्षात येते.

अब्रह्मचर्य हे अनिश्चय आहे. अनिश्चय हे उदयाधीन नाही.

मी तर चार-पाच जणांना विचारले तर चकीत झालो. मी म्हटले, भाऊ, अशी पोल (बहाणे, अप्रामाणिकता) चालणार नाही, हा तर अनिश्चय आहे. त्यास तर काढावेच लागेल. ब्रह्मचर्य तर पहिले पाहिजे. तसे निश्चयाने तर तुम्ही ब्रह्मचारीच आहात परंतु व्यवहाराने सुद्धा व्हावे लागेल ना.

ब्रह्मचर्य आणि अब्रह्मचर्याचा ज्याला अभिप्राय नाही, त्याला ब्रह्मचर्य व्रत वर्तनात आले असे म्हटले जाईल. निरंतर आत्म्यात राहणे, हे आमचे ब्रह्मचर्य आहे. तरीही आम्ही या बाहेरील ब्रह्मचर्याचा स्वीकार करीत नाही असे नाही. तुम्ही संसारी आहात म्हणून मला सांगावे लागते की अब्रह्मचर्यास हरकत नाही, परंतु अब्रह्मचर्याचा अभिप्राय तर असायला नकोच. अब्रह्मचर्य तर आपल्यासाठी निकाली फाईल आहे. पण अजुनही

यात अभिप्राय वर्तत आहे आणि या अभिप्रायमुळे 'जसे आहे तसे' आरपार पाहू शकत नाही, मुक्त आनंदाचा अनुभव करु शकत नाही, कारण की यात अभिप्रायाचे आवरण अडचणरुप बनते. अभिप्राय तर ब्रह्मचर्याचाच ठेवला पाहिजे. व्रत कशास म्हणतात? तर (आपल्या आपणच) वर्तत असते त्यास व्रत म्हणतात. ब्रह्मचर्य महाव्रत कशास म्हणतात? की ज्याला अब्रह्मचर्याची आठवणच येत नाही, त्याला ब्रह्मचर्य महाव्रत वर्तनात आहे असे म्हणतात.

## [ 10 ] आलोचनेनेच टळतात, जोखिम व्रतभंगाचे

भगवंताने काय म्हटले आहे की तू स्वतःहून व्रत तोडले तर तुटेल. अन्य कोणी कसे तोडवू शकेल? असे कुणाच्या तोडल्याने व्रत तुटत नसते. व्रत घेतल्यानंतर व्रताचा भंग झाला तर आत्मा (आत्मज्ञान) सुद्धा निघून जातो. व्रत घेतले असेल तर त्याचा भंग आपल्याकडून होता कामा नये. आणि भंग झालाच तर स्पष्ट सांगून द्यावे की आता माझ्या ताब्यात राहिले नाही.

## [ 11 ] चारित्र्याचा प्रभाव!

व्यवहार चारित्र्य अर्थात पुद्‌गल चारित्र्य, डोळ्यांनी दिसेल असे चारित्र्य आणि दुसरे निश्चय चारित्र्य उत्पन्न झाले म्हणजे देव झाला असे म्हटले जाईल. सध्या तर तुम्हां सर्वांना 'दर्शन' आहे, नंतर ते ज्ञानात येईल, परंतु चारित्र्य उत्पन्न होण्यास तर अजून वेळ लागेल. पण तरीही हे अक्रम असल्या कारणाने चारित्र्यही सुरु होते, परंतु ते तुम्हाला समजणे कठीण आहे.

**प्रश्नकर्ता :** व्यवहार चारित्र्यासाठी दुसरे विशेष काय करावे?

**दादाश्री :** काही नाही. ह्या व्यवहार चारित्र्यासाठी तर आणखी काय करावे? तर ज्ञानींच्या आज्ञेत रहावे हेच व्यवहार चारित्र्य आणि त्यात जर कधी ब्रह्मचर्यही पाळले गेले तर अति उत्तम आणि तेव्हाच खरे चारित्र्य म्हटले जाईल.

जग जिंकण्यासाठी एकच चावी सांगतो की विषय जर विषयरुप

झाले नाही तर संपूर्ण जग जिंकू शकाल. कारण की मग त्याची गणना शीलवानात होते. जगाचे परिवर्तन करु शकतो. तुमचे शील पाहूनच समोरच्या व्यक्तित परिवर्तन होते, नाहीतर कोणाचेही परिवर्तन होऊ शकणार नाही. उलट विपरित होईल. आता तर शीलच पूर्णपणे समाप्त झाले आहे ना!

चोवीस तीर्थंकरांनी एकांत शैयासन सांगितले आहे. कारण की दोन प्रकृति एकाकार, संपूर्णपणे 'एडजस्टेबल' असू शकत नाहीत. म्हणून 'डिसएडजस्ट' होतच राहतील आणि त्यामुळे संसार चालूच राहील, अंतच येणार नाही. म्हणूनच भगवंताने शोधून काढले की एकांत शैया आणि आसन.

# खंड : २
# आत्मजागृतीने ब्रह्मचर्याचा मार्ग

## [ 1 ] विषयी-स्पंदन, मात्र जोखिम

विषयांपासून तर भगवंतही घाबरले आहेत. वीतराग भगवंत कुठल्याच गोष्टीला घाबरले नव्हते, परंतु एक विषयला मात्र ते घाबरले. घाबरले अर्थात काय की जेव्हा साप जवळ येत असेल, तेव्हा प्रत्येक मनुष्य पाय वर करुन घेतो की नाही!

## [ 2 ] विषय भूकेची भयानकता

ज्याला खाण्यात असंतुष्टता असेल त्याचे चित्त जेवणात जात असते, आणि जिथे हॉटेल दिसेल तिथे चित्त चिकटत असते, परंतु फक्त खाण्याचाच एक विषय आहे का? हे तर पाच इन्द्रिये आणि त्यात कितीतरी विषय येत असतात. ज्याला खाण्याची असंतुष्टता असेल त्याचे चित्त खाण्यात जाते. त्याच प्रमाणे ज्याला पाहण्यात असंतोष असेल तो जिथे-तिथे डोळे फिरवतच राहतो. पुरुषाला स्त्रीचा असंतोष असेल आणि स्त्रीला पुरुषाचा असंतोष असेल तर तिथे त्यांचे चित्त आकर्षित होते. याला भगवंताने मोह म्हटला आहे. पाहताच आकर्षित होतो. स्त्री दिसली की चित्त आकर्षित होते.

'ही स्त्री आहे' असे पाहतो. तर ते पुरुषाच्या आत रोग असेल तरच त्याला स्त्री दिसेल, नाहीतर आत्माच दिसेल आणि 'हा पुरुष आहे' असे पाहते, तो त्या स्त्रीचा रोग आहे. निरोगी झालात तर मोक्ष होईल. आता माझी निरोगी अवस्था आहे. म्हणून मला असा विचारच येत नाही.

स्त्री-पुरुषांनी एकमेकांना स्पर्श करु नये, यात खूप जोखिम आहे. जोपर्यंत पूर्ण झालो नाही तोपर्यंत स्पर्श करु शकत नाही. नाहीतर विषयाचा एक जरी परमाणू घुसला तर कितीतरी जन्म बिघडवून टाकतो. आमच्यात तर विषयाचा परमाणूच नसतो. एकही परमाणू बिघडला तर लगेचच प्रतिक्रमण करावे लागते. प्रतिक्रमण केले तर समोरच्या व्यक्तिला (विषयाचा) भाव उत्पन्न होत नाही.

एक तर स्वत:च्या स्वरुपाचे अज्ञान आणि वर्तमानकाळाचे ज्ञान त्यामुळे त्याला राग (मोह, आशक्ति) उत्पन्न होतो. परंतु जर त्याला असे समजले की ती गर्भात होती तेव्हा अशी दिसत होती, जन्मली तेव्हा अशी दिसत होती, लहान होती तेव्हा अशी दिसत होती, मग अशी दिसत होती. आता अशी दिसत आहे, नंतर अशी दिसेल, म्हातारी होईल तेव्हा अशी दिसेल, पक्षाघात होईल तेव्हा अशी दिसेल, प्रेतयात्रा निघेल तेव्हा अशी दिसेल, अशा सर्व अवस्था ज्याच्या लक्षात आहे, त्याला वैराग्य शिकवावे लागत नसते! हे तर जे आज दिसत आहे ते पाहूनच मूर्छित होत असतात.

## [ 3 ] विषय सुखात दावे अनंत

या चार इन्द्रियांचे विषय काही त्रास देत नाहीत, परंतु हा जो पाचवा विषय आहे, स्पर्श विषय आहे तो तर समोरच्या जिवंत व्यक्तिसोबत आहे! ती व्यक्ति दावा मांडेल अशी आहे, म्हणून फक्त या एका स्त्री विषयात हरकत आहे. ही तर जिवंत 'फाईल' म्हटली जाते आपण म्हटले की आता मला विषय बंद करायचा आहे, तेव्हा ती व्यक्ति म्हणेल की असे चालणार नाही. मग लग्नच कशाला केले? अर्थात ती जिवंत 'फाईल' तर दावा मांडेल आणि दावा मांडलेला कसा परवडेल? अर्थात जिवंत व्यक्तिसोबत विषय-संबंध करुच नये.

दोन मन एकाकार होऊच शकत नाहीत. म्हणून मग दावेच चालतात. हा विषय सोडून बाकी सर्व विषयांत एक मन आहे, एकपक्ष आहे. त्यामुळे समोरचा दावा मांडत नाही!

**प्रश्नकर्ता :** विषय रागाने भोगले जाते की द्वेषाने?

**दादाश्री :** रागाने. परंतु या रागामधुन द्वेष उत्पन्न होतो.

**प्रश्नकर्ता :** द्वेषाचे परिणाम उत्पन्न झाल्याने उलट जास्त कर्म बांधले जातात ना?

**दादाश्री :** नुसते वैरच बांधत असतो, अर्थात ज्याला ज्ञान नसेल त्याला आवडत असेल तरीही कर्मबंधन होते आणि आवडत नसेल तरीही कर्मबंधन होते, आणि 'ज्ञान' असेल तर त्याला कोणत्याही प्रकारचे कर्मबंधन होत नाही.

म्हणून जिथे-जिथे ज्या-ज्या व्यक्तिसाठी आपले मन आकर्षित होत असेल त्याच व्यक्तिच्या आत जो शुद्धात्मा आहे तोच आपल्याला ह्या आकर्षणातून सोडवणारा आहे. म्हणून त्या शुद्धात्म्याजवळच मागणी करावी की मला ह्या अब्रह्मचर्य विषयापासून मुक्त करा. इतर सर्व ठिकाणी यातून सुटण्याचे प्रयत्न केले तर ते व्यर्थ आहे. त्याच व्यक्तिचा शुद्धात्मा आपल्याला ह्या विषयातून सोडवणारा आहे.

विषय हे आसक्तीने उत्पन्न होत असतात, नंतर त्यातून विकर्षण उत्पन्न होत असते. विकर्षण झाले की वैर बांधले जाते आणि वैराच्या 'फाउन्डेशन' (पायावर) वर हे जग उभे राहिले आहे.

असे आहे ना की, या अवलंबनाचे आपण जितके सुख घेतले आहे ते सर्व उसने घेतलेले सुख आहे, 'लोन' वर घेतले आहे आणि 'लोन' म्हणजे 'रिपे' करावे (फेडावे) लागते. लोन फेडले गेले की मग कसलीच झंझट उरत नाही.

## [ 4 ] विषयभोग नाही निकाली

एक साधु महाराज होते, ते व्याख्यानात विषय संबंधीत खूप सारे

बोलत असे, परंतु लोभ संबंधीत गोष्ट आली तर तेव्हा मात्र काहीच बोलत नसत. एका विचक्षण श्रोत्याच्या लक्षात हे आले की हे महाराज कधी लोभाची गोष्ट का करत नाहीत? सर्वकाही बोलतात, विषयाच्या बाबतीतही बोलतात. म्हणून मग तो महाराजांकडे गेला आणि एकांतात त्यांचे गाठोडे उघडून बघितले. तर त्यातील एका पुस्तकाच्या आत सोन्याचे नाणे ठेवलेले होते, त्याने ते नाणे काढून घेतले आणि निघून गेला. नंतर महाराजाने जेव्हा गाठोडे उघडून पाहिले तर ते नाणे काही मिळे ना. नाण्याला खूप शोधले पण ते काही सापडले नाही. दुसऱ्या दिवसापासून महाराजांनी लोभाविषयी सांगण्यास सुरुवात केली की लोभ करु नये.

आता तुम्ही जर विषयाच्या बाबतीत बोलू लागले तर तुमची ती लाईन असेल तरीही ती तुटून जाईल कारण तुम्ही मनाच्या विरोधात आहात. मनाचे वोटिंग (मत) वेगळे आणि तुमचे वोटिंग वेगळे झाले. तेव्हा मन समजून जाते की 'हे तर आपल्या विरोधी होऊन गेले, आता आपले वोट चालणार नाही.' पण आत कपट आहे म्हणून लोक बोलत नाहीत, आणि असे बोलणे हे काही सोपे सुद्धा नाही ना!

**प्रश्नकर्ता :** पुष्कळ लोक असे समजतात की अक्रममध्ये ब्रह्मचर्याला काही महत्वच नाही. ते तर डिस्चार्जच आहे ना!

**दादाश्री :** 'अक्रमचा' असा अर्थ होतच नाही. असा अर्थ करणारा 'अक्रम मार्गाला' समजूच शकला नाही. जर तो खरोखर समजला असेल तर मला विषयासंबंधी त्याला पुन्हा सांगण्याची गरजच नसते. अक्रम मार्ग म्हणजे काय, तर डिस्चार्जलाच डिस्चार्ज समजले जाते. पण ह्या लोकांचे डिस्चार्जच नाही. त्यांच्यात तर अजून लालच आहे आत! हे सर्व तर अजून राजीखुशीने करत असतात. डिस्चार्जला कोणी समजू शकले आहे का?

## [ 5 ] संसारवृक्षाचे मूळ, विषय

या दुनियेचा संपूर्ण आधार पाच विषयांवरच आहे. ज्याला विषय नाही, त्याला संघर्ष नाही.

**प्रश्नकर्ता :** विषय आणि कषाय, या दोघांत मुलभूत फरक काय आहे ?

**दादाश्री :** कषाय हे पुढील जन्माचे कारण आहे आणि विषय हे मागील जन्माचा परिणाम आहे, अर्थात ह्या दोघांत तर खूपच फरक आहे.

**प्रश्नकर्ता :** हे जरा सविस्तर समजवा.

**दादाश्री :** हे जितके सर्व विषय आहेत. ते मागील जन्मांचे परिणाम आहेत. म्हणून आम्ही रागवत नाही की तुम्हाला मोक्ष हवा असेल तर जा एकटे पडून राहा, घरातून बाहेर हाकलवले नसते का तुम्हाला? परंतु आम्ही आमच्या ज्ञानात पाहिले आहे की, विषय हे मागील जन्माचा परिणाम आहे, म्हणून म्हटले की जा, घरी जाऊन आरामशीर झोपा, निवांतपणे फाईलींचा निकाल करा. आम्ही पुढील जन्माची कारणे तोडून टाकतो परंतु जे मागील जन्माचे परिणाम आहेत त्यांना आम्ही छेदू शकत नाही, कोणाकडूनही ती छेदली जाऊ शकत नाही. महावीर भगवानांकडूनही छेदली जाऊ शकत नाही. कारण की भगवानांना सुद्धा तीस वर्षांपर्यंत संसारात राहावे लागले होते आणि मुलगीही झाली होती. विषय आणि कषायाचा खरा अर्थ हा होतो. पण लोकांना हे माहितच नसते ना! हे तर फक्त भगवान महावीर एकटेच जाणतात की याचा अर्थ काय होतो.

**प्रश्नकर्ता :** पण विषय आले, तर कषाय उत्पन्न होतात ना?

**दादाश्री :** नाही. सगळे विषय हे विषयच आहेत, पण विषयात अज्ञानता असेल तर कषाय उत्पन्न होतात आणि ज्ञान असेल तर कषाय उत्पन्न होत नाहीत. कषायांचा जन्म कुठून झाला? तर म्हणे, विषयांमधून. अर्थात हे जे सर्व कषाय उत्पन्न झालेले आहेत ते सर्व विषयातून उत्पन्न झालेले आहेत. परंतु यात विषयाचा दोष नाही, अज्ञानतेचा दोष आहे. मूळ कारण काय आहे? तर अज्ञानता.

## [ 6 ] आत्मा अकर्ता-अभोक्ता

विषयाचा स्वभाव वेगळा आहे आणि आत्म्याचा स्वभाव वेगळा

आहे. ह्या पाच इन्द्रियांच्या विषयातून आत्म्याने कधीही काहीही भोगलेच नाही. तरीही लोकं म्हणतात की माझ्या आत्म्याने विषय भोगले!!! अरे, आत्मा भोगत असेल का? म्हणूनच कृष्ण भगवतांनी म्हटले की, 'विषय विषयात वर्ततात.' असे म्हटले तरी लोकांना ते समजले नाही. आणि हा तर म्हणतो, 'मीच भोगत आहे.' नाहीतर लोकं तर असे म्हणतील की, विषय विषयात वर्तत असतात, आत्मा तर सूक्ष्म आहे. म्हणून भोगा! असा त्याचाही दुरुपयोग करुन टाकणार.

## [ 7 ] आकर्षण-विकर्षणाचा सिद्धांत

हे सर्व आकर्षणामुळेच टिकून राहिले आहे! लहान मोठ्या आकर्षणामुळे हे संपूर्ण जग उभे राहिले आहे. यात भगवंताला काही करण्याची गरज पडली नाही, फक्त आकर्षणच आहे! हे स्त्री-पुरुषाचे जे आहे ना, तेही फक्त आकर्षणच आहे. टाचणी आणि लोहचुंबकाचे जसे आकर्षण आहे तसेच हे स्त्री-पुरुषांचे आकर्षण आहे. सर्वच स्त्रियांसाठी आकर्षण होत नसते. परमाणू जुळत असतील त्या स्त्रियांसाठीच आकर्षण होत असते. आकर्षण झाल्यानंतर स्वतः नक्की केले असेल की मला आकर्षण होऊ द्यायचे नाही तरीही आकर्षण होते.

**प्रश्नकर्ता :** हे पूर्वीचे ऋणानुबंध झाले ना?

**दादाश्री :** ऋणानुबंध म्हटले, तर संपूर्ण जग हे ऋणानुबंध आहे. पण आकर्षण होणे ही गोष्ट तर अशी आहे की त्यांच्या परमाणूंचा एकमेकांशी हिशोब आहेत, म्हणून ओढले जातात! आता जो राग (मोह) उत्पन्न होत असतो, तो खरोखर राग नाही. हे जे लोहचुंबक आणि टाचणी आहे, ते लोहचुंबक जर फिरवले तर त्यानुसार टाचणी मागे पुढे होत असते. त्या दोघांमध्ये जीव तर नाही. तरीही लोहचुंबकाच्या गुणामुळे दोघांमध्ये आकर्षण होत असते. त्याच प्रमाणे ह्या देहाशी मिळतेजुळते परमाणू ज्याचे असतील त्याच्यासाठीच त्याला आकर्षण होते. त्यात लोहचुंबक आहे, आणि यात (देहात) इलेक्ट्रिकल बॉडी (तेजस-शरीर) आहे! पण जसे लोहचुंबक लोखंडाला ओढते, दुसऱ्या कोणत्या धातुला ओढत नाही.

हे तर इलेक्ट्रिसिटीमुळे परमाणू प्रभावित होतात आणि त्यामुळे परमाणू ओढले जातात. जसे टाचणी आणि लोहचुंबक यांच्यामध्ये कोणी येते का? टाचणीला आपण शिकवले होते का, की तू खाली वर हो म्हणून?

अर्थात हे देह तर संपूर्ण विज्ञान आहे, विज्ञानाने हे सर्व चालत असते. आकर्षण होते त्यास लोक म्हणतात की मला राग झाला. अरे, आत्म्याला राग होत असेल का? आत्मा तर वीतराग आहे! आत्म्याला रागही नसतो आणि द्वेषही नसतो. हे दोन्ही स्व-कल्पित आहेत. ही भ्रांति आहे. भ्रांति निघून गेली तर दूसरे काहीच नाही.

**प्रश्नकर्ता :** आकर्षणाचे प्रतिक्रमण करावे लागते का?

**दादाश्री :** हो नक्कीच! आकर्षण-विकर्षण या शरीराला होत असेल तर आपल्याला चंदुभाऊला सांगावे लागते की, 'हे चंदुभाऊ, (फाईल नं.१) इथे आकर्षण होत आहे म्हणून प्रतिक्रमण करा, तर मग आकर्षण बंद होऊन जाते. आकर्षण आणि विकर्षण दोन्ही गोष्ट आपल्याला भटकवणाऱ्या आहेत.

## [ 8 ] वैज्ञानिक गाईड ब्रह्मचर्यासाठी

असे पुस्तक हिंदुस्तानात निघालेच नाही, हिंदुस्तानात कितीही शोधले तरी असे ब्रह्मचर्याचे पुस्तक मिळणार नाही. कारण की जे खरे ब्रह्मचारी होते ते सांगण्यासाठी राहिले नाहीत. अणि जे ब्रह्मचारी नाहीत, ते सांगण्यासाठी राहिले परंतु त्यांनी काही लिहीलेले नाही. जे ब्रह्मचारी नाहीत ते कसे लिहू शकतील? स्वत:मध्ये जे दोष असतात, त्यावर विवेचन लिहिणे संभव नाही. तात्पर्य जे खरे ब्रह्मचारी होते ते सांगण्यासाठी राहिले नाहीत. जे खरे ब्रह्मचारी होते ते चोवीस तीर्थंकर! कृपाळुदेवांनीही यावर थोडे फार सांगितले आहे.

हे आपले ब्रह्मचर्याचे पुस्तक ज्याने वाचले असेल तोच ब्रह्मचर्य पाळू शकेल. नाहीतर ब्रह्मचर्य पाळणे हे काय सोपे आहे?

❖ ❖ ❖ ❖ ❖

# संपर्क सूत्र

## दादा भगवान परिवार

**अडालज** : **त्रिमंदिर**, सीमंधर सिटी, अहमदाबाद-कलोल हाईवे, पोस्ट : अडालज, जि.-गांधीनगर, गुजरात - 382421, फोन : (079) 39830100

**अहमदाबाद** : **दादा दर्शन**, ५, ममतापार्क सोसाइटी, नवगुजरात कॉलेजच्या मागे उस्मानपुरा, अहमदाबाद-380014. फोन : (079) 27540408

**वडोदरा** : **दादा मंदिर**, १७, मामाची पोल-मुहल्ला, रावपुरा पुलिस स्टेशन समोर, सलाटवाड़ा, वडोदरा. फोन : 9924343335

**गोधरा** : **त्रिमंदिर**, भामैया गाँव, एफसीआई गोडाउन समोर, गोधरा जि.-पंचमहाल. फोन : 9723707738

**राजकोट** : **त्रिमंदिर**, अहमदाबाद-राजकोट हाईवे, तरघड़िया चोकड़ी (सर्कल), पोस्ट : मालियासण, जि.-राजकोट. फोन : 9924343478

**सुरेन्द्रनगर** : **त्रिमंदिर**, लोकविद्यालय जवळ, सुरेन्द्रनगर-राजकोट हाईवे, मुळी रोड. फोन : 9737048322

**अमरेली** : **त्रिमंदिर**, लीलीया बायपास चोकडी, खारावाडी. फोन : 9924344460

**मोरबी** : **त्रिमंदिर**, पो-जेपुर (मोरबी), नवलखी रोड, जि.-मोरबी, फोन : 9924341188

**भुज** : **त्रिमंदिर**, हिल गार्डनच्या मागे, एयरपोर्ट रोड. फोन : 9924345588

**अंजार** : **त्रिमंदिर**, अंजार-मुंद्रा रोड, सीनोग्रा पाटीया जवळ, सीनोग्रा गाँव, ता.-अंजार. फोन : 9924346622

---

| | | | |
|---|---|---|---|
| **मुंबई** | : 9323528901 | **दिल्ली** | : 9810098564 |
| **कोलकता** | : 9830093230 | **चेन्नई** | : 9380159957 |
| **जयपुर** | : 8290333699 | **भोपाल** | : 9425024405 |
| **इन्दौर** | : 9039936173 | **जबलपुर** | : 9425160428 |
| **रायपुर** | : 9329644433 | **भिलाई** | : 9827481336 |
| **पटना** | : 7352723132 | **अमरावती** | : 9422915064 |
| **बेंगलूर** | : 9590979099 | **हैदराबाद** | : 9885058771 |
| **पूणे** | : 7218473468 | **जालंधर** | : 9814063043 |

---

| | | | |
|---|---|---|---|
| **U.S.A.** | : +1 877-505-DADA (3232) | **UAE** | : +971 557316937 |
| **U.K.** | : +44 330-111-DADA (3232) | **Singapore** | : +65 81129229 |
| **Kenya** | : +254 722 722 063 | **Australia** | : +61 421127947 |
| | | **New Zealand** | : +64 21 0376434 |

**Website : www.dadabhagwan.org**



## ब्रह्मचर्य अरे,
## असे तर जाणलेच नव्हते कधी!

लोकांना अब्रह्मचर्याच्या गोष्टीत कोणते नुकसान आहे व कोणता फायदा आहे, तसेच त्याच्या केवढ्या तरी जबाबदाऱ्या आहेत, हे लक्षात येईल आणि ब्रह्मचर्य पाळतील, यासाठीच तर ब्रह्मचर्यासंबंधी आम्ही बोललो आहोत, ज्याचे हे पुस्तक बनले आहे. सर्वांनीच असे सांगितले आहे की 'अब्रह्मचर्य चुकीचे आहे, ब्रह्मचर्य पाळले पाहिजे' अरे भाऊ, अब्रह्मचर्य कसे बंद होईल? त्याचा मार्गच दाखवला नाही. म्हणून या पुस्तकात ते सर्व मार्गच दाखवले आहेत, जेणे करुन लोकं ते वाचून विचार करतील की अब्रह्मचर्यामुळे एवढे सारे नुकसान होते! अरे, असे तर आम्हाला माहितच नव्हते!

-दादाश्री

dadabhagwan.org

Printed in India

Price ₹20